कोणत्याही मानव समाजात लोक रूढी, लोक निती व प्रचलित कायदे, संकेत, शिष्टाचार यासारखी सामाजिक नियमने असतात. मानव प्राणी उक्रांत बनत गेला. टोळी प्रमुख, राज्यसत्ता,धर्मसत्ता यांचेकडे सामाजिक नियमने करण्याची जबाबदारी होती. उक्रांतीच्या पुढच्या टप्यात राज्यसत्ता, धर्मसत्ता प्रबळ झाल्या. बऱ्याच अंशी मानवाचे सर्व प्रकारचे नियंत्रण त्यांचेकडे होते. अगदी १९व्या शतकापर्यंत राज्यसत्ता ही अनियंत्रीत पध्दतिची होती.राजा विविध प्रकारचे नियम, कायदे बनवित असे. प्राचीन इतिहास पाहिला तर धर्मसत्ता आणि राजसत्ता एकमेकांना पुरक होती. नवनविन भुभाग आणि साम्राज विस्ताराची महत्वाकांक्षेपोटी अनेक लढाया, युध्दे झाली. यामधून जित, जेते अशा प्रकारची विभागणी झाली.जेत्यांनी जित लोकानी गुलाम करणेसाठी राज्या सत्तेचा आणि धर्म सत्तेचा वापर करून त्यांच्या वर बंधणे लादली. यातील काही बंधने कायदा , सामाजिक आचार विचार, व्यक्तिगत जिवन नियमित करणारी होती.त्यामधुन कायम स्वरूपी गुलाम किंवा जित असलेची भावना जाणवत रहावी अशी व्यावस्था निर्माण केली. प्राचीन काळापासून मानवाचा इतिहास पाहिला तर त्यांचे प्रत्यंतर येते. भारतात वर्ण व्यवस्था आर्यअनार्य संघर्षातून निर्माण झाली.तर प्राचीन ग्रीक देशात सुध्दा गुलामगिरीची पध्दत होती. युरोपियन देशानी काळया लोकांना गुलामगिरीत लोटले. इस्लामच्या उदयानंतर मध्य पुर्वेतील देशानी जिंकलेल्या प्रदेशावर नियत्रण करताना धर्माची बंधने लादली.

तर काही मानव समुहाबद्दल अत्यंत हिंणसक अशी भावना होती. युरोपियन गोरे - आफ्रिकन काळे, त्याच बरोबर युरोपिअन ु जू (व्यापारी जमात )अत्यंत कंजूष म्हणून प्रसिध्द होती. आर्य विरूध्द अस्पृश्य, इस्लाम धर्मीय विरूध्द अन्य धर्मीय ही त्यांची उदाहरणे आहेत.अशा गुलाम किंवा जीत लोकावर अनेक जेत्या राजवटीनी दमनकारी कायदे लादले. कधी धर्माच्या नावावर तर कधी राज्य सत्तेच्या बळावर, त्याच पध्दतीने ब्रिटीश भारतात आल्यानंतर अनेक कायदे निर्माण केले.त्याच पैकी १८७१ चा ऊीळाळपरश्र ीीळलश रलीं होय. याच कायद्याखाली आणि वसाहतीमधील गुन्हेगार रचनेची आपण चर्चा या सेमिनार मध्ये करणार आहोत. या कायद्याची रचना त्याचा परिणाम काय? याची चर्चा करणार आहोत.त्या पुर्वी या कायदा बनविण्यासाठी काय पार्श्वभुमी होती, कायदा का बनला याची चर्चा करणार आहोत.

## पार्श्वभूमी

प्राचीन काळापासून भारताचा मध्यपुर्व, युरोपाशी व्यापारी संबध होते. हा व्यापार खुष्कीच्या मार्गाने चालत होता. भारतीय मालास युरोपीय बाजारपेठेत चांगलीच मागणी होती. खुष्कीच्या मार्ग बंद झाल्यामुळे व्यापारासाठी सागरी मार्गाचा शोध सुरू झाला.तेथील राजा अन दर्यावर्ती लोकांनी अनेक मोहिमा आखल्या. त्यातून विविध खंडाचा, देशांचा शोध लागला.

युरोपात मध्य युगात नवनवे विचार साहित्यातून मांडण्यात परंपरा सुरू झाली. त्यापुर्वीच छपाई यंत्राचा शोध लागल्यामुळे हे विचार लोकापर्यत पोहचू लागले.या शोधामुळे नवविचारांच्या साहित्यामुळे विज्ञानाला चालना मिळाली. विज्ञानाच्या विविध शाखेत नवनविन शोध लागू लागले.

अचूक नकाशे बनिवण्याचे तंत्र विकसीत झाले. होकायंत्राचा शोध लागला. त्यामुळे युरोपात नवे भूप्रदेश शोधण्याची चळवळीला गती आली.त्याला राजाश्रय मिळत असे.

पोर्तुगीजचा वास्को द गामा १४९८ मध्ये भारतात आला.कालीकत बंदरात तो पोहोचला. त्याने झामोरिन राजाकडून व्यापारी सवलती मिळवल्या. अन १५१० मध्ये गोवा, दीवदमन, आपल्या ताब्यात घेतले. पोर्तुगिजांनी भारत व्यापारात प्रचंड संपत्ती मिळवली. स्पर्धा इर्षेमुळे पाठोपाठ इंग्रज, फ्रेंच भारतात आले. हा व्यापार १८ व्या शतकापर्यत भरभराटीस आला. हया व्यापारात इंग्लंड अग्रेसर होते. व्यापार आणखीन वाढवणे गरजेचे होते. त्याच वेळी इंग्लंडमध्ये धावत्या धोटयाचा शोध लागला.शोधामुळे यांत्रीक प्रगतीमुळे कापड उत्पादन वाढले. नवनवीन शोधामुळे कारखाने स्थापन झाले. त्यामुळे कारखानदारला चालना मिळाली. अनेक वस्तूंचे उत्पादन वाढले. या जादा मालास हक्काची बाजारपेठ हवी होती. त्यासाठी ईस्ट इंडिया कंपनी स्थापन झाली.त्यानी मोघल आणि बंगालचा नवाब यांचेकडून अनेक व्यापारी सवलती घेतल्या. इंग्रज धुर्त होते. फक्त व्यापार करणे हा त्यांचा उद्देश नव्हता. तर संरक्षण करण्याच्या निमित्ताने आपल्या वखारींना संरक्षक तटबंदी करण्यास सुरवात केली. त्याच बरोबर स्वत:चे सैन्य बाळगू लागले.१८ व्या शतकाच्या उत्तरार्धातात (१७६४ बक्सारची लढाई ) बंगालमध्ये त्यांची सत्ता स्थापन झाली. फोडा आणि झोडा या नितीचा अवलंब करून त्याचबरोबर सत्ता समतोलाचा सिदधांत त्यानी अंमलात आणून येथील देशी राज्ये जिंकून घेतली.

त्या वेळी संपुर्ण देशावर कोणत्याही राजाचा एकछत्री अंमल नव्हता. बराचसा भाग मोघल साम्राजाने व्यापला होता. पण अठराव्या शतकात त्याला उतरती कळा लागली होती.अनेक सुभेदार स्वतंत्र झाले होते. शीख,जाट, राजपूत, यांची छोटी मोठी राज्ये होती. दक्षिणेत मराठा, निजाम होता. त्यांच्यामधील दुहीचा फायदा घेत इंग्रज राज्याकर्ते बनले.

१८१८ पर्यत जवळ जवळ सर्व देशावर इंग्रजांचा एकछत्री अंमल सुरू झाला. अठराव्या शतकापासून ते १८१८ पर्यत साम्राज्य विस्तार करीत असताना ब्रिटीशांना फार मोठया विरोधाला आणि संकटाला तोंड द्यावे लागले. येथील राजे आणि ब्रिटीश असा संघर्ष होता. आधुनिक शस्त्रे, शिस्तबध्द सैनिक, लांब पल्याच्या तोफा आणि एकएकटे गाठून जवळपास सर्व देशी राजांचा त्यांनी पराभव केला.

ब्रिटीश राजवटीमुळे भारतीय समाज जीवनावर फार मोठे परिणाम घडून आले.

ब्रिटीशांनी १८१८ पर्यत मराठे, मोगल, निजाम, टिपु सुलतान, जाट, शीख, रजपुत राजाशी संघर्ष करून ती राज्ये जिंकली.राज्ये जिंकत असताना त्यांनी या राजांचे सैन्य बळ कमी कसे होईल इकडे लक्ष पुरविले. परत तो बलवान होता कामा नये. त्याच बरोबर इतर राज्याशी संघर्ष चालूच राहावा अशी जाणीव पुर्वक परिस्थिती निर्माण केली. या कुटनितीचा उपयोग करून मुठभर इंग्रजानी देशावर आपला अंमल बसविला. काही राजांची राज्ये खालसा केली. काहींना थोडया फार सवलती दिल्या. पण त्यांचे आधिकार काढून घेतले.

एक राज्य जरी जिंकले, तरी त्या राजाच्या नावाने त्यांचे सरदार उठाव करीत. पण ते बंड इंग्रजानी मोहिमा आखून वेळ प्रसंगी अन्य देशी राजवटीची मदत घेऊन मोडून काढली.

या संघर्षाला ब्रिटीश विरूध्द देशी राजा आणि सैन्य असे स्वरूप होते. तर राजाच्या नावाने बंड करणारे व्यक्तीगत कारणासाठी, भुभाग वर्चस्वासाठी किंवा सरदारकी साठी काही वेळा संघर्ष करीत.

ब्रिटीश राजवट स्थिर होण्याच्या प्रकियेमुळे अनेक समाज जीवनात बदल झाले.किंबहूना ब्रिटीश राजवटीमुळे अनेक दृष्य व अदृष्य परिणाम भारतीय समाज जीवनावर घडून आले.ब्रिटीशाकडून पराभूत देशी राजांचे प्रथमत: सैन्य बळ कमी करण्यात आले. त्यामुळे अनेक सैनिक बेकार झाले. मोघल काळात लढाऊ सैन्याबरोबर त्यांना जीवनावश्यक वस्तू पुरविणारे किंवा रसद पुरविणारे व्यापारी तांडे असत. त्याचबरोबर वरकड कामे करणारे गडी माणसे आणि बाजारबुणगे असत. त्याचबरोबर शस्त्रे बनविणारे लोकही असत. तसेच नाणी पाडणारे कारागीरही असत. राहुट्या ठोकणे अन्य कामासाठी वरकड माणसे असत, मोघल साम्राज्याच्या पतनानंतर किंवा विघटनानंतर देशी छोट्या मोठ्या राजवटीत त्यांनी आश्रय घेतला. मराठी राज्याच्या प्रभावाच्या काळात थोडीफार रचना याच पद्धतीची होती. मोघल साम्राज्याच्या पतनानंतर मराठा राजवटीत या लोकांनी आश्रय घेतला. मराठा राजवटीनंतर हे लोक बेकार झाले. पोटासाठी त्यांची भटकंती सूरू झाली. त्यांनी काही वेळा लूटालूटीला आरंभ केला. ब्रिटीशांच्या कायद्याच्या राज्याला आव्हान दिले.

तर दुसऱ्या बाजूला मराठा सैन्याबरोबर पेंढारी लोक असत. ते लष्करात पगारी नोकर नसत. मुख्य सैन्याच्या आगे मागे त्यांच्या टोळ्या होत्या. शत्रूच्या प्रदेशातील लूटीवर

जगावे अशी अपेक्षा होती. शत्रूच्या प्रदेशाची लूट करणे, नासधूस करणे अशा प्रकारची अलिखीत नियम असे. परंतू त्यांचा उपद्रव मराठा सत्ता बळकट होती तोपर्यंत नव्हता. परंतू, उत्तर पेशवाईत हे पेंढारी अनावर झाले. मध्य प्रदेश, महाराष्ट्रात लूटालूट करून त्यांनी मुलुख उध्वस्त केला. अशा लोकांचा बंदोबस्त इंग्रजांनी मोहिमा आखून केला. प्रसंगी मराठा राजवटीचे लष्कर मदतीला घेतले. पुन्हा या लोकांकडून ब्रिटीशांना धोका पोहचू नये. त्याचबरोबर काही डोंगरी जमाती होत्या. बंगाल, उत्तरपूर्व भारतात सत्ता विस्तारण्यात त्यांनी विरोध केला.१७४४ साली नागालॅंड मध्ये आदिवासी विरोधात मोहीम काढून बंड मोडून काढले.

जे लोक लुटालुट करतात अशा लोकांना फक्त लढाई करून पराभूत केले असे नाही तर त्यांच्या बंदोबस्तासाठी दमनकारी कायद्याचा वापर केला. त्याची प्रभावी अंमलबजावणी केली.ब्रिटीश राजटीमुळे दुसरा परिणाम म्हणजे राजाश्रय असणारे कारागीर आणि राजांची वरकड आश्रीत माणसे बेकार झाली.

त्यामध्ये सुतार काम, लोहार काम, माती काम,गवंडी काम, दगड घडविणे इ. नविन राजवटी स्थिर होण्याबरोबर इंग्रजानी स्वत:च्या सोयीसाठी व्यापार आणि सैन्याची ने - आण करण्यासाठी भौतिक सुविधा निर्माण केल्या. त्या मध्ये रस्ते, पुलबांधणी, आदि कामे असत. पारंपारिक बैलाच्या पाठीवरून व्यापार करणाऱ्या जमातीही बेकार झाल्या. आधुनिक साधने आणि रस्त्यामुळे त्यांचा व्यवसाय साफ बुडाला.

तर दुसऱ्या बाजूला ग्रामिण समाज जीवनात कारागिरांचा वर्ग ही होता. विणकर, आदि कारागिरांना इंग्रजांच्या मालाशी स्पर्धा करावी लागल्यामुळे व राज्य त्यांचेच असल्यामुळे त्याचा पुरेपुर फायदा इंग्रजी व्यापारी उठवीत.

तर बहुतांशी जनता शेती व त्यावर आधारीत उद्योगावर जगत होती. १७ व्या शतकाच्या उतरार्ध आणि अठराव्या शतकाच्या पुर्वाधात अनेक दुष्काळ पडले. अन्न, पाण्याअभावी शेकडो माणसे मरत असत. गुरे ढोरे अन्न पाण्या अभावी तडफडून मरत. जोडीला साथीचे रोग पसरत. त्यामुळे मुलुख उजाड होत होता. ब्रिटीश अंमला पुर्वी देशी राजांची आपापसात लढाई होत असे. त्यामुळे मुलुख उध्वस्त होत असे. लुटालुट करणे. शत्रुची गुरे ढोरे, बायका पोरे, संपत्ती लुटणे अशी राज्य मान्य पध्दती आक्रमक वापरत. त्यामुळे शेतीवर आधारीत लोकही वैतागत, उत्तर पेशवाईच्या काळात या गोष्टींना कोणताच धरबंद राहिला नाही.संपुर्ण अठरावे शतक मराठयांनी लढायांची धामधूम केली.या लढाया महाराष्ट्र व महाराष्ट्राच्या बाहेरही झाल्या. शाहू - ताराबाई, आंग्रे -पेशवे, पेशवे -नागपुरकर भोसले, शिंदे -होळकर त्याच बरोबर निजाम व अन्य राजांच्या स्वाऱ्या होत. त्यामुळे या सर्वांचीच झळ सामान्य माणसाला, शेतकऱ्याला, शेतमजुराला लागत असे.

परंतू उत्तर पेशवाई(बाजीरावांच्या ) काळात लुटालुटीचा कहर झाला होता.

त्या मुळे त्रस्त, रयत, इंग्रजांचा अंमल येत आहे हे पाहताच काहीशी सुखावली. कारण ब्रिटीशांनी दुरदृष्टीने कायद्याचा अंमल बसविण्यास सुरवात केली.एक राजा एकच कायदा अशा प्रकारचे ते सुत्र होते. ब्रिटीश अंमलाखाली प्रदेशाला कायदे लागू केले. एक बाजूला छोटी मोठी बंडे मोडीत काढत, सामान्य रयतेला चुचकारत. त्यांना दिलासा मिळावा यासाठी ब्रिटीशानी धुर्त पावले उचलली.

१८१८ नंतर पेशवाई मुलुख ताब्यात घेतल्या नंतर इंग्रजानी जाहीरनामा काढला. त्यात म्हटले आहे.''मुलुख बहुतेक उध्वस्त झाला होता. तो कंपनी सरकारच्या भरवश्यावर आबाद झाला.वाजवी असेल ते सुरळीत चालेल. कुणावर जुलुम जाजदी होणार नाही. येविसी कोणही मनात आंदेशा घेऊ नये''.

अशा प्रकारे सामान्य रयतेला चुचकारून त्यांच्या मनात राजवटी विषयी आस्था निर्माण करण्याची दुरदुष्टीची खेळी इंग्रजानी खेळली होती.

**जंगल कायदा**

ब्रिटीश अंमल सर्व भारताभर सुरू झाल्यानंतर त्यांनी स्वत:चे कायदे कानून बनविणे सुरू केले. त्या कायद्यामध्ये जंगले, नद्या, शेती, जमिन यांच्या मालकी हक्का संबंधी कायदे तयार झाले. या कायद्याची माहिती जंगलाच्या आश्रयाला राहून उपजिवीका करणाऱ्या जमातींना असणे शक्य नव्हते. कारण त्या जमाती एकतर जंगलातील अन्न, शिकार करून जगत होत्या. त्याचबरोबर मध, प्राण्यांची कातडी, लाकूड फाटा विकून आपला उदरनिर्वाह करत. त्यांच्या मुक्त स्वातंत्र्यावर ब्रिटीश कायद्यामुळे बंधने आली. जंगलावर कोणाचीही मालकी असू शकते. ही कल्पनाच सहन करण्या पलीकडची होती. यातून ब्रिटीश विरूद्ध जंगल आश्रीत जमातीत संघर्ष सुरू झाला. ठिकठिकाणी ब्रिटीश सत्ते विरोधात त्यांनी उठाव केले.

तर दुसऱ्या बाजूला जंगलात राहणारे हे लोक आणि मराठे व पूर्वीच्या मुस्लिम राजवटीत गडकिल्याच्या घेऱ्याच्या रक्षणाचे काम करणाऱ्या काही जमाती होत्या. त्यांना गड किल्ले आदि मोक्याच्या जागेवरून हुसकावून लावण्यात आले. त्यामुळे ब्रिटीश आणि या जमातीत संघर्ष पेटला.

ब्रिटीशपूर्वीचे राज्य कर्त्यांनी या जमातीच्या मुक्त स्वातंत्र्यावर कधी बंधने टाकली नाहीत. उलट या लोकांच्या कौशल्याचा उपयोग चांगल्या प्रकारे केला. त्यामुळे संघर्षाचा प्रसंग क्वचीत येत असे. मात्र ब्रिटीश आल्यावर या जमातीच्या मुक्त स्वातंत्र्यावर बंधने आली.

## ब्रिटीशांच्या कायद्याची संकल्पना

ईस्ट इंडिया कंपनीने भारतात सत्ता स्थापन करताना कायद्याची अंमलबजावणी सुरू केली. हे कायदे इंग्लंडच्या धर्तीवर आधारीत होते. जिंकलेल्या प्रदेशावर कायदा आणि सुव्यवस्था शांतता राखण्यासाठी दिवाणी व फौजदारी कायदे व न्यायालये निर्माण करायला सुरूवात केली. प्रथम बंगालमध्ये त्यानंतर सिंध बिहार मध्ये पुढे प्रदेश जिंकेल तसतसे त्या भागात त्याची अंमलबजावणी सुरू झाली.

ब्रिटीश भारतात येण्यापूर्वी त्यांचा अंमल बजावणीपूर्वी तीन राज्य व्यवस्था अस्तित्वात होत्या.

१) सरंजामशाही संस्थानिक / राजा

२) आदिम जमातीचे राष्ट्रके

३) ईस्ट इंडिया कंपनीच्या अंमलाखालील भारत

ब्रिटीशांनी स्वत:चे कायदे निर्माण करायला सुरूवात केल्यानंतर त्या देशातील जनतेला हे कायदे कानून नवीनच होते. राज्य सत्ता, किंवा देशी सरंजामदार प्रजेचे संगोपन आणि न्यायदान करीत. नियम कायदे बनवित तर दुसऱ्या बाजूला अदिम टोळयांची स्वत:ची स्वतंत्र न्यायदान पद्धती होती. स्वत:ची जात पंचायत होती. या जात पंचायतीमध्ये दिवाणी, फौजदारी गुन्हा संबंधी न्यायदान होई.

या आधुनिक कायद्याची संकल्पना भारतवासीयांना मानवणारी नव्हती. ब्रिटीश येई पर्यंत त्यांची मानसिकता मध्य युगिन संकल्पनेप्रमाणे होती. राजाला दंड किंवा न्याय देण्याचा अधिकार आहे. त्याचपद्धतीने पारंपारीक धर्मसत्ताही दंड करू शकत होती.

ब्रिटीश अंमलाखालील जनतेला आधुनिक संकल्पना, कायदा, लोकशाही, स्वातंत्र्य या कल्पना अद्याप समजायच्या होत्या. त्यामुळे ब्रिटीश कायदे मान्य करण्याची तयारी त्यांची नव्हती. यामधून ब्रिटीश विरूद्ध राजसत्ता यांचा संघर्ष सुरू झाला. इंग्रजांनी आक्रमण करून परंपरागत कायदे मोडीत काढून आपल्या कायद्याची अंमलबजावणी करण्यास सुरूवात केली.

याच पार्श्वभूमीवर मोघल, मराठे, यांच्याकडे असणारे पेंढारी किंवा सैन्याबरोबर असणारी वरकड माणसे असत. हे पूर्वी पाहिले आहे. पानीपत युद्धानंतर ब्रिटीशांचा अंमल बंगाल आणि बिहार या प्रांतात सुरू झाल्या. नंतर हे लोक बेकार झाले.

हेच लोक गटागटाने किंवा टोळ्या करून भारतभर भटकत राहिले आणि लूटमार करून उपजिवीका चालवू लागले. लूटमार करणे किंवा नासाडी करणे याबद्दल त्यांना कोणताच खेद खंत वाटत नसे. तो आमचा परंपरागत व्यवसाय आहे असेच त्यांची मानसिकता होती.

पण ब्रिटीश अंमलाखालील प्रदेशात लूटमार करू देणे किंवा अशांतता माजवू देणे

त्यांना परवडणारे नव्हते. या पूर्वी देशी राजांच्या आपापसातील लढाया, नैसर्गिक आपत्ती, दुष्काळ, साथीचे रोग यामुळे प्रजा त्रस्थ झाली होती. अशा वेळी लोकांना आपल्या राजवटीबद्दल आस्था किंवा जिव्हाळा वाटावा आणि कोणी बंड करू नये. जेणेकरून निर्वेध पणे व्यापार उद्योग चालावा अशी दूरद्दष्टी राजकारणी खेळी होती. पेंढारी व सैन्यातील वरकड लोंकाकडून ब्रिटीश सत्तेला धोका आहे. हे ओळखून त्यांच्या संपुर्ण नाश आणि बंदोबस्त करण्यासाठी त्यांनी मोहीमा आखल्या. टोळयांचा बिमोड केला. त्यावर न थांबता त्यांचा बंदोबस्त करण्यासाठी कायद्याचे शस्त्रही वापरले.

गटागटाने किंवा वैयक्तीक रीत्या वाटमारी किंवा दरोडे लुटालूट करणाऱ्या टोळयांच्या विरोधात २६,१७९३ अन्वये कारवाई करणाच्या अध्यादेश काढला. पुढे मुंबई इलाख्यात १८२७ ला आधिनियम संमत करण्यात आला.

या कायद्यानुसार या ठग, पेंढारी, भटक्या टोळया यांच्यावर लक्ष ठेवावे अशी अधिकाऱ्यांना सुचना देण्यात आल्या. त्यांची अमलबजावणी ही सुरू केली. तर मुंबई इलाख्यातील आधिनियमानुसार अशा टोळया किंवा जमातीवर नियंत्रणे आणली. त्यांच्या रात्रीच्या संचारावर बंधने घालण्यात आली. त्याच बरोबर गाव पाटलाने त्यांच्या वर नजर ठेवणे इ. या आधिनियमाचे स्वरूप होते. स्थानिक ग्रामव्यवस्थेमधील आधिकाऱ्यांची मदत या कामी घेतली असे दिसते.

या कायद्याला किंवा आधिनियमाला युरोपात असणारी भटक्या किंवा जिप्सी सारख्या टोळया बद्दलची मानसिकता कारणीभूत होती. या भटक्या जिप्सी लोकांना युरोपात किंवा इंग्लंड मध्ये त्यांना गुन्हेगार जमाती म्हणून घोषीत केले होते.तीच पार्श्वभूमी या कायद्याला होती. ''बदक हे बदकच असल्यामुळे ते पाण्यातच जाणार या जमातीतील जन्मलेली व्यक्ती ही गुन्हेगारच होणार '' अशा प्रकारचा गैर समज मनात बाळगल्यामुळे त्याच प्रकारची कारवाई भारतातील टोळयांचा बंदोबस्त करण्यासाठी कायद्याची अंमल बजावणी करताना लागू केली. जिप्सी बद्दलचे गृहीतक या ठग अन् पेंढारी टोळयाला लागू केले. आणि त्याप्रमाणे कायदा बनविला गेला.

१७९३ कायदा आणि गृहितक (जिप्सी संबधी ) १८७१ च्या गुन्हेगारी कायद्याची पहिली पायरी होती.

१८१८ ते १८५७

१८१८ ला पेशवाईच्या अस्तानंतर जवळपास भारतभर ईस्ट इंडिया कंपनीची सत्ता आली.सर्व देशी राजे , संस्थानिक राजांना पराभूत करून ब्रिटीशानी सत्ता प्रस्थापित केली. छोटी मोठी राजांची सैन्य कमी करून तर कधी तैनाती फौजांचा वापर करून या राजांना मर्यादित आधिकार देऊन सर्व बाजूनी जखडूनच ठेवले होते. त्या मुळे त्यांच्यात बंडाची ताकद

राहिली नव्हती. परंतू तरी सुध्दा १८१८ ते १८५७ पर्यंत कालखंडात भारतभर छोटी मोठी बंडे झाली. अर्थात इंग्रजानी लष्करी बळावर एक एकटे गाठून त्यांचा बिमोड केला. या बंडोखोरात किंवा उठाव कारणात दोन भाग होतात. पहिला भाग होता. छोटी मोठी देशी, संस्थानिक, सरदार किंवा त्यांचे सरंजाम दार यानी इंग्रजी सत्ते विरोधात उठाव केला. इंग्रजी राज्यामुळे ही राज्ये, त्यांचे सैन्य बळ कमी झाले. त्यांचे अधिकारही काढून घेतले होते.त्यामुळे देशी संस्थानिक चिडले होते. कित्तूरची राणी चन्नमा हिने इंग्रजी सत्ते विरूध्द उठाव केला. तिचा सरदार संगोळी रायांन्ना याने इंग्रजांना चांगलेच झुंझविले.त्याच बरोबर सावंतवाडी, कोल्हापूर येथून सुध्दा उठाव झाला. तर पेशव्यांच्या वतीने त्रिंबकजी डेंगळेने उठाव केला. तर सातारा राजाच्या वतीने रंगेबापूजी उठावाच्या तयारीत असताना पकडला गेला. उठाव उघडकीस आला. तर दक्षिणेत सुरपुर बेरड संस्थानिकाने व्यंकाप्पा नायक याने उठाव केला.

या उठावात जसे त्यांचे सैनिक होते.तसेच कोळी, रामोशी, बेरड,धनगर, भिल्ल,मराठे,आदि लढाऊ जमाती अग्रेसर होत्या.

तर दुसऱ्या बाजूला अनेक आदिवासीनी इंग्रजी सत्ते विराधोत उठाव केला.त्यामध्ये उत्तर पुर्वेच्या सिंगभूच्या ' हो 'जमातीने बंड केले (१८३१ ). इंग्रजानी पध्दतशीर मोहीम आखून हे बंड मोडून काढले.त्याच बरोबर बंतिया टेकडयावरील आदिवासीनी बंड केले. त्यांचे बंडही चिरडले गेले.१८५५ मध्ये संथाळ (प. बंगाल)नी उठाव केला. त्याच बरोबर (१८४६)गोंडानी गोंडवनात (माळवा,वऱ्हाड)उठाव केला.तोही चिरडून टाकला.१८२० च्या दरम्यान तंटया भिल्ल, हौसाजी नाईक यानी धुळे, खानदेश या भागात इंग्रजी सत्ता झुगारून दिली. १८२० ते ३१ या दरम्यान महाराष्ट्रात उमाजी नाईकाचे बंड गाजले. त्याच्या पाठोपाठ १९४२ते ४५ या दरम्यान त्यांची मुले तुकाराम आणि महंकाळ यानी बंड केले. त्याच दरम्यान राघोजी भांगरा या कोळयाने बंड केले.

हरी रामोशी, अन् त्यांच्या साथीदांरानी बंड केले. दुसऱ्या प्रकारच्या बंडात किंवा उठावात एक प्रमुख सुत्र होते.उठाव करणाऱ्या जमाती या एकतर आदिवासी होत्या.तर काही जंगलामधील मुक्त स्वातंत्रावर बंधने, पारंपारीक आश्रयस्थानावरून हुसकावून लावणे. किंवा वतने वगैरे खालसा केल्यामुळे हे लोक चिडले होते.त्यानी इंग्रजाविरोधात शस्त्रे उचलले.पण इंग्रजानी निर्दयपने ही बंडे चिरडून टाकली. इंग्रजांच्या कायदा आणि सुव्यवस्थेला यांना आव्हान देणाऱ्या काही जमाती होत्या.इंग्रजी राजवट आल्यामुळे त्यांचा पारंपारीक उदर निर्वाहाचे साधन हिरावून घेतले होते. त्याचा धंदा व्यवसाय बसला होता. फुटकळ धंदा व्यवसायावरून त्यांचा उदर निर्वाह चालने शक्य नव्हते. त्यामुळे चोरी -मारी करून, वाटमारी करून आपले पोट भरत होत्या.या जमाती भटक्या अस्थिर होत्या.

यामधील लमाण ही जमात बैलाच्या साहाय्याने मोघल, मराठे, यांच्या सैन्याला रसद

पुरविण्याचे काम करीत होते. तर छप्पर बंद जमात मोघल सैन्यात राहुटया ठोकण्याचे काम करत.वडार, पाथरवट दगड घडविण्याचे, मुर्तीकामा,माती काम करीत. कंजारभाट, राजस्थान, पंजाबमधुन भटकत पोट भरण्यासाठी भटकंती करत महाराष्ट्रात आले असावे.

या जमातीने चोऱ्या, दरोडे, घालून कंपनीच्या कायद्याच्या राज्याला आव्हान दिले.त्यामुळे त्यांचा बंदोबस्त करण्यात आला.

### इंग्रजाचे धोरण, व त्यांच्या समस्या

तातडीने आदिवासी, इतर बंडे मोडून काढण्यासाठी, सैन्याची ने-आण करण्यासाठी दळणवळणाची सुविधा असणे गरजेचे होते.त्याप्रमाणे जलद वहातूकीसाठी रेल्वे सुरू केली. त्या सुविधांचा वापर व्यापारासाठी ही होणार होता.

याच बरोबर वारंवार होणारे दंगे धोपे, बंडे मोडीत काढणे आवश्यक होते.चोऱ्या, मारामारी यांचाही बंदोबस्त होऊन सामान्य रयत बंडात सहभागी होऊ नये. याची काळजी घ्यावी लागणार होती.त्या साठी कठोर कारवाई करणे आवश्यक होते. तरच रयतेला आपल्या राज्याबद्दल प्रेम वाटणार होते. यासाठी उपाय योजना इंग्रज आखत होते.बंडखोरामागे रयत उभी राहिली तर आपणास राज्य करणे शक्य नाही. हे धूर्त इंग्रजांनी हेरले होते. त्यामुळे कठोर दमनाचा मार्ग अवलंबावा लागणार होता, फक्त शस्त्र बळ त्यासाठी अपुरे होते. अशा वेळी कायद्याचा वापर करण्याचे त्यांनी ठरवले.

पारंपारीक राजे रजवाडेंचे एकदा सैन्य बळ कमी केले आणि आधिकार काढून घेतले की त्यांचे बळ संपत होते. थोडीफार सवलत, ऐष आरामाची साधने उपलब्ध केली. की ते राजे रजवाडे खुष असत. त्यामुळे लढण्याची मानसिकता विसरून जात. परंतू आदिवासी किंवा भटके लोक जंगल आश्रयाने राहात. गमिनी काव्याने लढण्यात तरबेज होते. त्यामुळे उमाजी नाईक, भिल्ल,कोळयांची बंडे मोडून काढताना इंग्रजांची बरीच दमछाक झाली होती.

१८५७ पर्यत छोटी मोठी बंडे इंग्रजाविरूध्द झाली. पण त्याचा विस्तार आणि व्याप्ती मर्यादित होती. पण १८५७ चे बंड त्याचा विस्तार, व्याप्ती खुप मोठी होती. तैनाती फौजा, दत्तक प्रकरणे, राज्ये खालसा करण्यामुळे देशी राजांच्या मनात खदखदणारा असंतोष उफाळून आला होता. त्याच पध्दती काही धार्मीक बाबतीत ही इंग्रजानी ढवळाढवळ केली होती.त्याच बरोबर दुष्काळ, लुटालुट,यामुळे सामान्य जनता हैराण झाली होती. देशी कारागीर छोटया व्यापारांचा वर्ग उध्दस्थ होण्याच्या मार्गावर होता. तर शेतकरी करांच्या ओझ्याखाली दबून गेला होता. अशा वेळी या बंडाने व्यापक आणि उग्र स्वरूप धारण केले.

मंगल पांडे या शिपाईने केलेल्या बंडाच्या निमित्ताने उत्तर भारतात बंडाचा वणवा पेटला.या बंडासाठी सामान्य जनतेतून शेतकरी, कारागीर,सरंजामदार, सरदार,आदिवासी जनता,भटकणाऱ्या टोळया यांचे व्यापक पाठबळ लाभले.शेवटी इंग्रजी फौजेतील देशी

शिपायानी उठाव केला.त्यामुळे इंग्रज भयभीत झाले. पण अक्कल हुशारीने इंग्रजांनी हे बंड मोडून काढले.त्याच प्रमाणे देशभर पसरू नये याची काळजी घेतली. शेवटी हे बंड चिरडून टाकण्यात कंपनी सरकारला यश आले.

या मधून इंग्रज एक बाब शिकले, की बंड कधीही संघटीत होऊ शकते. या बंडासाठी सामान्य माणूसही सशस्त्र बंडात सहभागी होतो. जनतेकडे त्याचबरोबर सैनिकी पेशा असणाऱ्या कडे पारंपारीक शस्त्रे होती. त्याचा वापर राज्य उलथून टाकण्यासाठी होऊ शकतो. अनेक ठिकाणी बंडाची कारस्थाने उघडीस आल्यावर याची कल्पना इंग्रजांना आली. (सातारा, कोल्हापूर, सुरपूर आदि) तर आदिवासी लोक पारंपारीक शस्त्रे बाळगत. तसेच मोक्याच्या ठिकाणी असणारे जमाती जवळ शस्त्रे होती. भटक्या टोळ्या सुद्धा शस्त्रे बाळगत.

हे सर्व लोक बंडात प्रत्यक्ष सहभागी झाले. तर काही ठिकाणी आदिवासी भटक्या लोकांनी बंडाच्या बातम्या देणे, रसद पुरविणे, आदि प्रकारे मदत केली. त्यामुळे फक्त युद्ध करून किंवा मोहिमा आखून बंडे शमणार नव्हती. त्यासाठी व्यापक व्युहरचना करावी लागणार होती. त्याचाच एक भाग म्हणून बंडानंतर इंग्रजांनी निशस्त्री करणाचा कायदा केला. परवान्या शिवाय शस्त्रे बाळगता येणार नव्हती. बंडामुळे कंपनी सरकारला घाबरले होते. कुठे किती शस्त्रे आहेत. त्यांचा वापर कसा होईल हे सांगता येणार नव्हते. त्यामुळे इंग्रज हादरून गेले होते. परिणामी निशस्त्री करणाचा कायदा संमत झाला. शस्त्रे काढून घेतलेले दुबळे हात इंग्रजाविरोधात लढू शकत नव्हते. या कायद्याच्या विरोधात कर्नाटकातील एका गावाने प्राणपनाने लढत दिली. परंतु एका गावाने केलेले बंड चिरडून टाकण्यात आले. (हलगली-मुधोळ) निर्दयपणे लोकांना गोळ्या घातल्या. तर काहींना मुधोळच्या भर बाजारात फाशी देण्यात आली. १८५७ च्या बंडात बेरड, रामोशी, धनगर, भिल्ल, कोळी, संथाळ, बंजारी, कैकाडी, कंजारभाट आदि भटकणाऱ्या आणि आदिवासी लोकांचा लक्षणीय सहभाग होता.

इंग्रजी राजवट स्थिर होण्यापासून १८ व्या शतकाच्या उत्तरार्धापासून १८५७ च्या उठावापर्यंत एक बाब स्पष्ट होती की या देशातील बहुसंख्य आदिवासी जंगल आश्रीत जमाती आणि भटकणाऱ्या टोळयांनी इंग्रज राजवटीला जोरदार विरोध केलेला दिसतो. उत्तर पूर्वेतील नागा, हो जमात, बिहार बंगालमधील संथाळ, मुंडा, राजस्थान, गुजरात, महाराष्ट्र भिल्ल जमात, महाराष्ट्र मधील महादेव कोळी, महाराष्ट्र कर्नाटक मधील रामोशी, बेरड, धनगर आदि लढाऊ जमाती नी विरोध केला. तर कैकाडी, कंजारभाट, पारधी, छप्परबंद आदिंनी काही अंशी या छोट्या मोठ्या बंडात भाग घेतला. तर वडार, पाथरवट, बंजारा, कटबू, रजपूतभामटा, मांग, कम्मी, भरपाशी, मांग गारूडी, बंजारी, तडवी, बागडी,वाघरी या जमातीनी अनेक चोऱ्या -माऱ्या, दरोडे घालून अशांतता माजवली होती. तर काही अंशी बंडाला मदत केली होती.

या बंडखोर जमातींचे चार प्रकार आहेत

१) पूर्ण जंगलात राहणाऱ्या जमाती

२) जंगल आश्रय व गडकिल्ल्यावर वस्ती असणाऱ्या जमाती

३) भटकणाऱ्या जमाती व व्यापारी जमाती

४) गाव गाडा किंवा गावाच्या आश्रयाने राहणाऱ्या जमाती

१. पूर्ण जंगलात राहणाऱ्या जमाती

संथाळ, नागा, हो जमात, गोंड, महादेव कोळी, कातकरी, कातोडी

२.जंगल आश्रीत व गड किल्ल्यावर वसती असणाऱ्या जमाती

रामोशी बेरड, कैकाडी, कोरकू, पारधी, वाघरी, तडवी इं.

३. भटकणाऱ्या व व्यापारी जमाती

राजपूत भामटा, लमाण,बावरी,पाशी, कंजार भाट, टकारी भामटा, छप्पर बंद, धरल, फटगुडी, कटबू, मांग गारोडी, मीना, उधिया, मारवाड, बाबरी.

४. गाव गाड्या किंवा गावच्या आश्रयाला राहणाऱ्या जाती

रामोशी बेरड, (१८ व्या शतकात गावगाड्यात हळू हळू स्थिर होऊ लागल्या.) वडार, धिसाडी आदि.

इंग्रजांनी प्रस्तूतच्या विषयाच्या संदर्भात त्यातील गुन्हेगार म्हणून घोषीत केलेल्या जमातींच्या फक्त आपण थोडक्यात त्यांचा सांस्कृतिक, सामाजिक, भौगोलिक इतिहास व रचना पाहणार आहोत. कारण कायदा बनण्यापूर्वी या जमाती कोण होत्या? त्यांना गुन्हेगार का घोषीत केले हे समजणे आवश्यक आहे.

देशभर इंग्रजांनी २८ जमातींना गुन्हेगार म्हणून घोषीत केले. याच गुन्हेगार जमातीने छोटी मोठी बंडे केली. १८५७ च्या बंडात सहभाग होते किंवा मदत केली. त्यांचा समूह नाश किंवा नायनाट करण्यासाठीच इंग्रजांनी दमनकारी कायद्याचा वापर केला. त्यापैकी १) निशस्त्रीकरणाचा कायदा २) १८७१ चा गुन्हेगारीचा कायदा - (घोषीत गुन्हेगार जमाती- कातकरी, कातोडी, रामोशी, बेरड, कैकाडी, कोकरू, पारधी,वाघरी, राजपूत भामटा, लमाण, बंजारी, बावरी, पाशी, कंजार भाट, टकारी भामटा, छप्पर बंद, धरल, फटगुडी, कटबू, मांग,मांगगारोडी, मीना, उधीया, मारवाड बावरी, भिल्ल, तडवी, महादेव कोळी )

या जमातीची भाषा, आणि शारीरीक वर्णन पाहिले तर यांच्यामध्ये दक्षिणेकडून आलेल्या जमाती आणि उत्तरेकडून आलेल्या जमाती असे दोन भाग पडतात. त्याचबरोबर भटक्या, गावगाड्याबरोबर राहणाऱ्या जमाती, जंगलात आश्रीत आणि गडकिल्ल्यावर राहणाऱ्या जमाती, पूर्णपणे जंगलात राहणाऱ्या असे भेद पडतात.

१) या पैकी दक्षिणेकडून आलेल्या जमाती आणि दक्षिणेतील जमाती

रामोशी, बेरड, टकारी भामटा, कटबू, मांग, मांगगारोडी, कम्मी, वडार, कैकाडी, कातोडी, कातकरी, महादेव कोळी.

२) उत्तरेकडून आलेल्या आणि मध्य भारतात आढळणाऱ्या जमाती

रजपूत भामटा, बावरी, भर पाशी, भिल्ल, छप्परबंद, धरल, फटगुडी, लमाणी, बंजारी, मारवाड बावटी, मीना, उधिया, पारधी, वाघटी, ससियाँ, वंजारी.

या जमातींची भाषा त्यांची राहण्याची पद्धत, शारीरीक वर्णन, भौगोलिक भिन्नता असली तरी त्यांच्यामध्ये विलक्षण साम्य आढळले. त्यांच्यामध्ये प्रचलीत असणारी मातृसत्ताक पद्धती, जातपंचायत, बळीप्रथा, निसर्गपूजा, टोटम पद्धती, देवके, जमातीबाह्य वर्ज्य संबंध, समृद्ध आणि मौखिक परंपरा पाहिली. जरी वांशिक दृष्ट्या नसले तरी सांस्कृतिक आणि सामाजिक दृष्ट्या एकाच संस्कृतीचे वारसदार आहेत व होते हे निश्चित.

गुन्हेगारी जमाती – विस्थापन

या जमातीच्या समृद्ध मौखिक परंपरा, त्यांच्यामधील दंतकथा, गाणी अभ्यासली तर त्याचबरोबर ऋग्वेद आणि त्यानंतर ऐतिहासीक संदर्भ तपासलेनंतर या जमाती मुळ वसतिस्थानावरून हुसकावून लावल्या आहेत हे स्पष्ट होते.

प्रा. राजेंद्र कुंभार यांचा आदिवासी विस्थापनेचा सिद्धांत आणि गुन्हेगारी जमाती

आदि मानवाच्या उत्क्रांतीच्या टप्प्यात वेगवेगळे शोध लागले. त्यातून विशिष्ट प्रकारचे मानवसमूह निर्माण झाले. शिकारी मानवाच्या पुढचा टप्पा म्हणजे पशुपालक मानव, त्यामधून शेतीचा शोध लागला. या मधूनच त्या नंतरील शेतकरी जमाती उदयाला आल्या. तर ज्या आदि मानवाला परिस्थितीनूसार जंगलाची विपुलता होते. तेथील मानव शिकारी बनला. ते जंगली प्राण्यावर जंगलसंपत्तीवर त्यांची उपजिवीका अवलंबून होती. तर जे मानव उत्क्रांतीच्या काळात नद्यांच्या सुपिक प्रदेशात स्थिरावला. हळूहळू त्यांची प्रगती कडे वाटचाल सुरू झाली. कमी श्रमात विपुल असे शेतीचे उत्पन्न यामुळे कला, कौशल्य, तंत्र यांचा विकास झाला. अशा मानवसमूहाची वाटचाल स्थिर नागरी संस्कृती कडे सुरू होती.

असे मानव समूहांची स्थिर जीवनामुळे लोकसंख्या वाढू लागली. त्यामुळे आजू बाजूंच्या जंगलावर आक्रमण करून पशुपालक, शिकारी, अन्न शोधक मानवाला विस्थापित करून शहरे वसविली. हे अविकसीत मानव दोन भागात विभागले, एक भाग आदिम कौशल्याचा पावर करून भीक मागून नागरी जीवनाच्या आश्रयाने राहणे. तर दुसरा भाग अन्नाच्या शोधात भटकत राहणे. आज भारतामध्ये ज्या भटक्या / अस्थिर जमाती दिसतात. त्यामध्ये अन्न शोधक, पशुपालक, शिकारी या तिन्ही प्रकारचे समूह आढळून येतात.

भारतात संस्कृतिच्या सर्व टप्प्यात वरील प्रकारचे मानवी समूह आढळून येतात.

भारताच्या संदर्भात अनेक मानव वंशांनी या देशावर आक्रमणे केली. अन्न आणि संपत्तीच्या आशेने ही आक्रमणे झाली. पुढे ते येथील समाजात मिसळून त्यांचा संस्कृती संकर झाला. पहिले ज्ञात आक्रमण आर्यांचे. ऋग्वेद, पुराणे, महाकाव्यात आर्य + अनार्यातील संघर्षाची अनेकदा वर्णने येतात. पहिले आक्रमण सप्तसिंधू प्रदेशात झाले असावे. या प्रदेशातील समृद्ध अशी सिंधू संस्कृतीचा विध्वंस करून, नगरे जाळून आणि त्याचप्रमाणे पाण्याचे पाट फोडून नगरे उध्वस्त केली. आक्रमकांच्या भितीने सैनिक, कारागीर, शेतकरी, व्यापारी वर्ग जंगलात पळून गेले. आर्य नगरांचा ताबा घेत. या संस्कृतीतील सैनिक वर्ग हा शिकारी बनला आणि दाट जंगलात राहू लागला. शेती करणारा वर्ग भटका पशुपालक बनला, तर कारागीर वर्गाजवळ त्यांचे उपजिवीकेचे अन्य साधन नव्हते. ते आर्य नगरांच्या आश्रयाने राहु लागले. त्यांनाच आर्यांनी शुद्र मानून त्यांचेकडून सेवा घेतली.

आर्य, आर्येतर लोकांना, दस्यु, राक्षस, शाखामृत, दृश्य, नाग,पणी अशी विशेषणे लावत. आजची बंजारा जात ही सिंधू संस्कृतीतील व्यापारी जमात असावी.कारण ऋग्वेदात या लोकांना पणी हा शब्द वापरला आहे.जिभेला चिरे देण्याच्या पध्दती व डोक्यावर सिंग धारण करण्याची पध्दत या सिंधू संस्कृतीशी मिळती जुळती आहे.

जंगलातील आदिवाशी, भटके आणि व्यापारी व शुद्र लोकात मातृपुजा, लिंगपुजा, स्थळपुजा, वृक्षपुजा, ही वैशिष्टे आढळतात.या लोकात असणारे साधर्म्य दाखवतात. एके काळी यांच्यात विलक्षण संबंधअसावेत.

प्रा.राजेंद्र कुंभार यांच्या मताप्रमाणे सिंधू संस्कृती ही नद्यांच्या खोऱ्या मधील निरनिराळया जमातीची सुखी नगरे असे, स्वरूप तत्कालीन राष्ट्रकांचे असावे.आर्यांनी त्यांचा पाणी पुरवठा तोडून, घरे जाळून त्यांच्यावर सहजी विजय मिळवला. मोहोंजदडो हडाप्पा यासारख्या शहरा मधून इजिप्त, मेसोपोटोमिया यांच्याशी व्यापार चालत असे. या शहरांना फार मोठी संरक्षण व्यवस्था नव्हती.

वेदामध्ये वस्त्र हननाचे वर्णन येते. म्हणजेच आर्यांनी धरणे फोडली.या आर्यांच्या टोळया असंस्कृत, रानटी, कला कौशल्य विहीन व स्त्रीविहीन अशा होत्या.त्यांच्या आक्रमणामुळे शहरातील लोक जंगलात पळून जात असत.

या आर्यांकडे कारागीर, शेती करणारे, सेवा उद्योग करणारे लोक नव्हते.म्हणून परागंदा झालेल्या व कामाच्या आशेने आलेल्या लोकांना, गुलामांच्या किंवा शुद्राच्या स्वरूपात गावाबाहेर गावाला लागून वस्ती करण्याची परवानगी देत.या लोकांनी आपापल्या देव देवता आजही जपुन ठेऊन त्यांची पुजा अर्चा करतात. परंतू त्यांनी आपली पुरोहित व्यवस्था आर्य सदृश्य बनली. यज्ञ संस्थेचा स्विकार केला.

एखाद्या दलदलीत डबक्यामध्ये अचानक दगड पडल्यास दोन प्रकारचे बदल घडून येतात.पहिल्या बदला बरोबर या डबक्या मधून दूर उडून जाणारा चिखल तेथेच वाळून जातो. किंवा अष्मिभुत होतो.पण उरलेला चिखल मात्र त्या दगडाला वेढून राहतो.आणि दगड चिखलाशी एकरूप झाल्यासारखा दिसतो.

या पध्दतीने अनार्य लोक जंगलामध्ये विस्थापित झाले. ते फळे, कंद मुळे, शिकार यांच्यावर उपजिवीका करून आपापल्या जमाती ची फिरती राष्ट्रे बनवून आदिम टोळयाच्या स्वरूपात जगू लागले.व आजही चालू आहे. नागर जीवना पासून संपुर्ण दुरावलेली ती संस्कृती जशीच्या तशी आहे. रूढी, परंपरा, न्याय व्यवस्थे बरोबर भटक्या लोकांनी ती टिकवून ठेवली.

या आदिम जमातीच्या संस्कृतिच्या आणि विद्येचा अभ्यास केला.की असे दिसते की देवके, देवदेवता, लग्नविधी, जन्म संस्कार,मृत्यु संस्कार, या बाबतीत या विभुक्त जातीजमाती यांचा मुळ स्त्रोत एकच आहे.या माजी गुन्हेगार जमातींना गाव वाडयात किंवा बलुतेदारी व्यवस्थेमध्ये काम आणि स्थान नाही.त्याची स्वतंत्र जात पंचायत आहे.त्याचा धर्म हिंदू किंवा मुस्लीम या स्वरूपाचा नाही.ते आदी देवतां चे किंवा शक्तीचे पुजा करतात.बळी देतात.निर्सगातील सृष्ठ -दृष्ठ शक्तीवर विश्वास ठेवतात. नागर समाजातील कायदे कानुन मानत नाहीत.अंगाखांद्यावर गोंदवतात, जमातीबाहेर शरीर संबंध करत नाहीत. जमाती बाहेरील पुरोहीत बोलवीत नाहीत. सर्व बाबीची विचार केल्या या जमाती हजारो वर्षापासून मुळ प्रवाहापासून तुटलेल्या, विस्थापित झालेल्या आहेत.

या जमाती परत्वे रूढी,परंपरा यामध्ये बदल आढळतो. मातृसत्ताक, पंचायत, दैवते, संस्कार याबाबतीत यांच्यात विलक्षण साम्य आढळले.

या जमाती एकतर जंगलात किंवा त्याच्या आधारे जगत होत्या. त्यांच्या संस्कृतीत अन्न साठा करण्याची वृत्ती नव्हती. मिळालेली कंदमुळे, अन्न धान्य, लाकूड फाटा, निसर्गाची देणगी म्हणून या जमाती वापरतात.जंगलावर कोणा एकाची मालकी असू शकते ही कल्पना या आदिम कायद्यामध्ये नव्हती.ब्रिटीश आल्यावर त्यानी जंगले, नद्या, शेती,जमिनी यांच्या मालकी हक्कासंबंधी कायदे केले.या कायद्याची माहिती या जमातींना असणे शक्य नव्हते.

या जमातीचे कायदे आणि ब्रिटीशांचे कायदे यांच्यात संघर्ष सुरू झाला. त्याचाच परिणाम म्हणून आदिम जमातींना नागर समाजाने चोर गुन्हेगार ठरले. त्यांना गुन्हेगार जमाती म्हणून ओळखले जाऊ लागले.

### इंग्रजांची चुकीची मानसिकता व गृहीतके

१८७१ चा कायदा बनवण्यामागे इंग्रजांच्या मनात चुकीची ग्रहीतके कारणीभूत आहेत.

युरोपात जिप्सी (भटक्या टोळ्यांना युरोपात जिप्सी म्हंटले जाते) या टोळ्या म्हणजे गुन्हेगार आणि लूटारू हा प्रचलित समज होता. त्यांना युरोपियन राज्यकर्त्यांनी गुन्हेगार म्हणून घोषीत केले. त्याचबरोबर त्यांच्या मुक्त स्वातंत्र्यावर टाच आणून त्यांना घेट्टो नावाच्या कुंपनाच्या आत अडकविले. त्यांच्या दैनंदिन वर्तनावर कठोर बंधने आणली. तोच गैरसमज मनात इंग्रज अधिकारी बाळगत. मोघल मराठा साम्राज्य पतनानंतर इथल्या भटक्या लूटालूट करणाऱ्या पेंढाऱ्याबाबत २६,१७९३ अन्वये अध्यादेश आणि जिप्सी संदर्भातील गैरसमज ही १८७१ च्या कायद्याची पहिली पायरी होती. त्यांची वारंवार होणारी बंडे, फिरत्या भटक्या लोकांचा अन् अदिवासांचा सक्रिय सहभाग व १८५७ युद्ध या पार्श्वभूमीवर झालेला निशस्त्रीकरणाचा कायदा हा दुसरा टप्पा होता किंवा पायरी होती.

त्याचबरोबर ब्रिटीश राज्यकर्ते, अधिकारी यांना या देशातील जाती व्यवस्था, हिंदू धर्म, तत्वज्ञान याचे नीट आकलन झाले नाही. आदिवासी, भटके लोक, जातीव्यवस्था यांच्याबद्दल चुकीची गृहीतके मनात बाळगल्यामुळेच पुढे अनेक घोटाळे झाले.

या बाबत टी.व्ही.स्टीफन यांच्या कायदा सुव्यवस्था कमीटीच्या (१८७१) भाषणातील उद्‌गार प्रतिनिधीक आहेत. ''भारतात जात आणि धंदा या दोन्ही गोष्टी एकच असतात. सुताराचा मुलगा सुतारच असतो. शतकानशतकापासून त्याचा धंदा तोच असतो. याचा विचार केला तर धंदेवाईक गुन्हेगार ही संज्ञा स्पष्ट होईल. याचा अर्थ या जमातीचा सदस्य पुरातन काळापासून गुन्हेगार आहेत. ते आपल्या जातीचा उपयोग गुन्हे करण्यासाठी करतात आणि त्यांचे वारस सुद्धा कायद्याच्या दृष्टीने गुन्हेगारी वर्तन करणार आहेत. त्यांचा ठगाच्या प्रमाणे संपुर्ण नायनाट केल्याशिवाय पर्याय नाही. जेंव्हा एखादा माणुस कायद्यासमोर गुन्हेगार असल्याचे कबूल करतो. आणि तो पूर्वीपासून तसा आहे आणि त्याचा अंतापर्यंत तसाच राहणार आहे हे निश्चित. तेंव्हा त्या जमातीमध्ये सुधारणा होणे अशक्य आहे. कारण गुन्हे करणे हा त्याचा धंदा आहे. त्याची जात आहे आणि मी असेही म्हणेन की जवळजवळ तो त्यांचा धर्महीं आहे.''

गुन्हा करणे, चोरी करणे, दरोडा टाकणे या गोष्टी जन्मजात असतात किंवा जातीव्यवस्थेचा भाग आहे असा चूकीचा सिद्धांत इंग्रज अधिकारी मनात बाळगून होते. हा तिसऱ्या पार्श्वभूमीवर १८७१ चा गुन्हेगार कायदा निर्माण झाला. हजारो लांकांना विस्थापीत करून जीवन नरक बनविणारा कायदा, या जमातीचे दमन अन् नायनाट करण्यासाठी वापरला.

१८७१ चा गुन्हेगार जमाती कायदा

१८७१ साली ब्रिटीश सरकारने पहिला गुन्हेगार जमाती कायदा संमत केला हा कायदा टी.व्ही. स्टीफन्स यांच्या गृहीतकावर आधारीत होता.

१) एखाद्या गटात किंवा जातीत जन्मलेली व्यक्ती जन्मजात गुन्हेगार बनते. कारण ती

आपल्या वडीलाचा व्यवसाय पत्करत असते.

२) एखादा गुन्हेगार बनलेली व्यक्ती आयुष्यभर गुन्हेगारच राहते. कारण तो आपला नशीब दत्त धंदा आहे. तो आपला धर्म आहे असे तो मानत असे.

३) सतत गुन्हेगारी कृत्य केल्यामुळे अशी व्यक्ती सराईत गुन्हेगार बनते. यावर आधारीत हा कायदा बनविण्यात आला. या कायद्यानूसार

४) घोषीत गुन्हेगार जमातीतील सर्व सदस्यांची नोंदणी पोलीस अधिकाऱ्यांनी केली पाहिजे. तसेच ठरावीक कालावधीनंतर नोंदणी कृत प्रत्येक सदस्याने पोलीस अधिकाऱ्यापुढे तो सांगेल त्यावेळी हजेरी देण्याची तरतूद करण्यात आली होती.

५) नेहमीच्या वसती स्थानावरून केलेल्या किंवा करावयाच्या नियोजीत स्थलांतरणाची किंवा वसती स्थान बदलण्याची किंवा वसतीतून गैरहजर राहण्याची परवानगी पोलीस अधिकाऱ्याकडून घेतली पाहिजे.

६) या कायद्यान्वये सरकारला एखाद्या गुन्हेगार जमातीतील सदस्याला एखाद्या विभागातून हद्दपार करण्याचे त्यांना इतर भागात स्थायीक करण्याचे अधिकार प्राप्त झाले होते. तसेच वरील नियमांचा भंग केल्याबद्दल शिक्षा देण्याचा अधिकार शासनाला प्राप्त झाले होते.

१) नियम भंगाच्या पहिल्या गुन्ह्यास एक वर्षाची सक्त मजूरीची शिक्षा

२) दुसऱ्या गुन्ह्यास दोन वर्षे किंवा त्याच्या नंतरच्या प्रत्येक गुन्ह्यास तीन वर्षे कारावास व ५०० रूपये दंड किंवा दोन्ही शिक्षा देण्याची तरतूद करण्यात आली होती.

१८७१ चा गुन्हेगार जमाती कायदा सर्वप्रथम सिंध प्रांतातील हूर जमातीला लावण्यात आला. त्यानंतर हळूहळू देशभर जवळपास २८ जमातींना कायदा लागू करण्यात आला. (बेरड, रजपूत भामटा, टकारी भामटा, वाघरी, भर आणि पाशी, भिल्ल, छप्पर बंद, धरल, फटगूडी, कैकाडी, कम्मी, कटबू, कातोडी, किंवा कातकरी, कोळी, लमाणी, मांग, मांग गारोडी, मारवाड बावरी, मीना, उधीया, पारधी, रामोशी, सांसिया, तडवी,वजारी,बागडी, इ)

या कायद्यामुळे अनेक प्रश्न निर्माण झाले. गुन्हेगारीत घट होण्याऐवजी वाढ झाली. निर्दोष व गुन्हेगार एकाच मापाने मोजण्याचा तो परिणाम होता. त्याचबरोबर गुन्हेगारीचा प्रश्न फक्त गुन्हा का करतात त्याचा मुळ कारणाचा शोध घेतला असता. असा मतप्रवाह पुढे आला. त्याचे कारण आर्थिक व उदरनिर्वाहाचे साधन नसणे हा आहे.

त्याचबरोबर ब्रिटीश समाजात गुन्हेगारी संबंधी झालेले संशोधन आणि त्यांचा गुन्हेगारी जमातीकडे पाहण्याचा पारंपारीक दृष्टीकोनात बदल झाला. त्यामधून १८९७ साली या कायद्यात बदल करण्यात आले.

**क्रिमीनल ॲक्ट मधील बदल, सुधारणा**

१) १८९७ ला ब्रिटीश कौंसिलने १८७१ च्या कायद्यात दुरूस्ती केली. १) यानूसार जमातीला दुसऱ्यांदा किंवा तिसऱ्यांदा गुन्हा करताना त्याच्या शिक्षेत वाढ करण्यात आली. २) चार ते अठरा वयोगटातील मुलांना त्यांच्या पालकापासून वेगळे करण्याचा सुधारात्मक वसाहतीमध्ये ठेवण्याचा अधिकार प्राप्त झाला होता.

२) १८९७ च्या गुन्हेगार कायद्यातील दुरूस्ती नंतरही गुन्हेगार लोकांना छळणे,डांबणे एवढेच केले जायचे. तुरूंगात गेलेला माणूस अधिक गुन्हेगार बनत होता. तर कुटुंबीय नाईलाजाने पोटासाठी गुन्हे करत होते. त्यामुळे गुन्हे वेगाने वाढत होते. ब्रिटीशांना ही नवीन डोकेदुखी झाली होती. त्याचवेळी अमेरिकन मिशनरी, सालवेशन आर्मी यांनी गुन्हेगार जमातीचा पुर्नवसनाचा व सुधारणाचा प्रयोग सुरू केला. विचारवांताचे लेखन पुर्नवसनाचे प्रयोग यामधूनच गुन्हेगार वसाहती कायदा करण्यात आला.

३) या कायद्याने विविध प्रांतिक सरकारांना संशयीत गुन्हेगार जमातीचे नोंदणी करण्याचे, पोलीसाकडून लक्ष ठेवण्याचे, प्रत्यक्ष गुन्हे केलेल्यांना वसाहतीत दाखल करण्याचे अधिकार देण्यात आले. २) वसाहतीत दाखल झालेल्या व्यक्तीस वा त्यांच्या जमातीला काम करावयास शिकवणे. त्याचप्रमाणे त्यांना रोजगार उपलब्ध करून देणे. प्रामाणिक पणे आयुष्य जगण्याची संधी उपलब्ध करून देणे.

४) वसाहतीत दाखल झालेल्या चार वर्षावरील मुलांना सक्तीने शाळेत घालणे व त्यांचे शिक्षण करणे. त्यांनतर (१९०८ व १९११ या साली) या कायद्यात बदल झाला.

५) १९११ दुरूस्ती कायदा -

या कायद्यानूसार गुन्हेगार जमातींना कायद्याची चार टप्प्यात विभागणी केली.

१)नोटीफिकेशन २) रजिस्ट्रेशन ३) रिस्ट्रीक्शन ४) वसाहतीत दाखल करणे. यापाठीमागे दोन प्रमुख उद्देश होते. १) असामाजिक तत्वापासून समाजाच्या हक्काचे संरक्षण करणे २) गुनहेगारी जमातीचे पुर्नवसन करणे.

गुन्हेगारी जमाती दुरूस्ती कायदा - १९२३-२४

यासाली हा कायदा दुरूस्त करण्यात आला. यापूर्वीच्या कायद्यातील तरतूदी काढून टाकण्यात आल्या. हा कायदा संपुर्ण देशभर लागू करण्यात आला.(१९२८)

१) गुन्हेगारी जमाती कायदा हे दमनाचे यंत्र बनू नये. तर या कायद्याचा उद्देश गुन्हेगार

जमातींना सर्वसाधारण समाजाशी एकरूप बनविणे हा असला पाहिजे.

२) एखाद्या संपुर्ण जमातीला किंवा त्यातील गुन्हेगार घोषीत करण्यापूर्वी किंवा वसाहतीत दाखल करण्यापूर्वी त्यांची कार्यालयीन चौकशी करणे हे बंधनकारक असले पाहिजे.

३) या कायद्यान्वये एखादी व्यक्ती किंवा जमात सराईत गुन्हेगार असल्याचे लक्षण आढळून आले असेल किंवा तो पद्धतशीर गुन्हे करीत असतील. त्या सर्वांना गुन्हेगार जमाती कायद्यान्वये सततच्या देखरेखीखाली आणण्यात आले पाहिजे.

४) नोटी फिकेशन - १९२४ च्या गुन्हेगार जमातीच्या कायद्याच्या सेक्शन ३ प्रमाणे स्थानिक सरकारांना कोणतीही जमात, टोळी, व्यक्तीचा वर्ग किंवा त्याचा एक भाग जर विना जामीनपात्र गुन्हे करण्यासाठी असेल तर त्याला गुन्हेगार जमात म्हणून घोषीत करण्याचे अधिकार प्राप्त झाले.

५) नोंदणी - यानूसार नोंदणी जिल्हा दंडाधिकारी - स्थानिक सरकारला त्यांच्या प्रदेशातील गुन्हेगार जमातीचे रजिस्टर ठेवण्याचे आदेश देतो. अशा लोकांची माहिती तो घेतो. त्यानूसार स्थानिक पाटील, पटवारी त्यांच्यावर त्यांचे जीवन अवलंबून होते.

६) वसाहतीत दाखल करणे. - १९२४ सेक्शन ६ नूसार - या जमातीच्या सुधारणासाठी शैक्षणिक आणि शेती वसाहती स्थापन करण्याचे अधिकार दिले. कोणालाही गुन्हेगार वसाहतीमध्ये दाखल करण्याचा अधिकार दिला.

७) अन्यायकारक शिक्षा - या कायद्याच्या कलम २३ नूसार दुसऱ्यांदा गुन्हा केल्यास किमान ७-१० वर्षे शिक्षा, तर तिसऱ्यांदा गुन्हा केल्यास जन्म ठेपेची शिक्षेची तरतूद करणेत आली.

गुन्हेगार कायद्यासंबंधीचे कमिशने

१८७१ चा कायदा दुरूस्ती करण्यासाठी किंवा गुन्हेगार जमातीचा आढावा घेण्यासाठी अनेक कमिटी, कमिशने सरकारने नेमली.

१) १८८७ साली पोलीस कमिटी -

२) १९१९ ची ऑल इंडिया जेल कमिशनने सर्व तुरूगांचा आढावा घेतला. त्याचबरोबर वसाहती बद्दल महत्वपूर्ण शिफारसी केल्या. यामध्ये रोजगार,शिक्षण, औद्योगिकीकरण सोसायट्या, मुलांना कुटुंबापासून दूर करू नये अशा महत्वपूर्ण शिफारसीही आहेत.

मुन्शी कमिशन - या कमिशनने अत्यंत उपयुक्त आणि महत्वपूर्ण शिफारसी केल्या.

क्रिमीनल ट्राईब म्युनुअल १९३८- १९३८ पर्यंत कायद्यातील बदल पाहिले. परंतू, या कायद्याचा नियम तरतूदी, अधिनियम आणि प्रत्यक्ष अंमलबजावणी संबंधीत अधिकाऱ्याची

कार्यकक्षा, अधिकार यांच्यात स्पष्टता किंवा एकवाक्यता नव्हती. त्यामुळे फार मोठा गोंधळ व्हायचा. अधिकारी आपल्याला पटेल त्याप्रमाणे या कायद्याचा अर्थ लावत होती. त्यामुळे सरक ारने गुन्हा अन्वेषन विभागाकडून या कायद्यातील नियम, अधिनियम तरतूदी तयार करून घेतल्या. त्यामध्ये कायद्याची विविध कलमे यांचे न्यायालयीन कक्षा पोलीस, न्यायखातेआणि गावप्रमुख यांच्याकडून अपेक्षित असलेल्या त्यांच्यावरील निश्चित जबाबदाऱ्या, अधिनियमाची काटेक ोर व्याख्या विविध जमातींच्या विविध टप्प्यावर लागू केलेल्या प्रतिबंधाचे स्वरूप इ. महत्वाच्या गोष्टी निश्चित केल्या आहेत. त्यामुळे देशभर एकाच प्रकारच्या या कायद्याची अंमलबजावणी होणार होती.

## गुन्हेगार जमातीच्या वसाहती / सेटलमेंट

१८७१ गुन्हेगार कायदा लागू केल्यानंतर गुन्हेगारीत वाढ होत असे दिसून आले. त्यासाठी अधिक कठोर बंधन या जमातीवर घातली पाहिजेत. याचबरोबर कायमपणे या जमातीच्या हालचालीवर नजर ठेवता येईल या उद्देशाने त्याचबरोबर त्यांचे पुर्नवसन व्हावे. रोजगार मिळावा यासाठी १९०८ साली वसाहती कायदा तयार करण्यात आला. युरोपमध्ये जू लोकांसाठी घेट्टो असत. या घेट्टो मध्ये ज्यू लोकांना डांबले जाई. बाहेर जाताना त्यांना ओळखपत्रे दिली जात. ती दिवसभर फिरत असताना जवळ बाळगावी लागत. सुर्यास्तापूर्वी त्यांना परत तटबंदीच्या आत डांबले जाई. सुर्योदयापर्यंत त्यांना बाहेर येता येत नसे. या संकल्पनेवर गुन्हेगार वसाहती कायदा तयार करण्यात आल्या.

देशभर गुन्हेगार जमातीच्या वसाहती आणि मुक्त वसाहती निर्माण करण्यात आल्या. मुंबई प्रांतात एकुण १२ वसाहती आणि ३ उप वसाहती होत्या, २ मुक्त वसाहती होत्या. त्या वसाहतीमध्ये १९३७ अखेर ८२३१ इतकी लोकसंख्या होती. या वसाहतीमध्ये प्रामुख्याने कैकाडी,घंटी चोर, हरणाशिकारी, मांग गारोडी, कंजारभाट, छप्परबंद, बेस्तर, घाटी,वडार,दोंग, दासूर, रामोशी, पामलोर,कटबू, कम्मी, लमाणी, मांग,धरल या जमातीचे सभासद आढळतात.

### वसाहतींची रचना

१९११ च्या कायद्यानूसार नोंदणी झालेल्या गुन्हेगार जमातींना या वसाहतीमध्ये दाखल करण्यात येत असे. त्याप्रमाणे एका प्रांतामधील जमाती दुसऱ्या प्रांतातील वसाहतीत सुद्धा दाखल होत.वसाहतीमध्ये शिक्षणाची सोय होती. मुलांसाठी खास शाळा असत. प्रत्येक १२ वर्षाच्या मुलांना प्राथमिक शिक्षण सक्तीचे होते. त्याचबरोबर या मुलांना पुढे धंदे, शिक्षण दिले जात असे. सुतार काम, गवंडी काम, शिवण काम, शेती, विणकाम, लोहार काम आदि.

### आरोग्य राहण्याची व्यवस्था

या वसाहतीमध्ये लोक स्वत:च्या झोपड्यात राहत. पिण्यासाठी पाण्याची सोय असे.

या वसाहतीसाठी वैद्यकिय अधिकारी नेमल्या जात असत. को-ऑप सोसायट्या स्थापन करून घरे बांधले जात. यासाठी लोकांना कर्ज देण्यात येत असे.

पतसंस्था

वसाहतीत पतसंस्था सहकारी उद्योग आदि संस्था चालू होत्या. दैनंदिन गरजा, कर्जे त्याचबरोबर उद्योग यासाठी संस्था सुरू होत्या.

१८७१ च्या कायद्याचा गुन्हेगार जमातीवरील परिणाम

१८७१च्या कायद्यामुळे गुन्हेगार जमातीवर आणि संपुर्ण समाज जीवनावर फार मोठे परिणाम घडून आले. त्याचे परिणाम आजही या गुन्हेगार जमाती भोगत आहेत. या कायद्यामुळे ताबडतोब काही परिणाम घडून आले.

तात्कालीन परिणाम

१)१८७१ साली हा कायदा संमत करण्यात आला. त्यानंतर सिंधू प्रांतातील 'हूर' जमातीचे बंड मोडून काढण्याच्या उद्देशाने तेथे कायदा प्रथम लागू करण्यात आला. त्यानंतर त्याची अंमलबजावणी पंजाब व अन्य प्रांतात सुरू झाली.

या कायद्यानूसार ब्रिटीशांनी जुलूम जबरदस्ती सुरू केली. कायद्याचे शस्त्र त्यांच्या हाती आले होते. भटक्या टोळ्याच्या सदस्यांना पकडणे, त्यांचा छळ करणे, तुरूंगात डांबणे, मनमानेल त्या प्रमाणे शिक्षा करणे. काही वेळा घरातील कर्ता पुरूष तुरूंगात गेल्यामुळे संपुर्ण कुटुंबाचा उदरनिर्वाहाचा प्रश्न निर्माण होत असे. त्यावेळी नाईलाजास्तव हे कुटुंब पोटासाठी गुन्हेगारीकडे वळत असे. तुरूंगातील निर्दोष माणुस सुधारण्यापेक्षा निगरगट्ट आणि सराईत गुन्हेगार म्हणून बाहेर पडत असे. यामुळे गुन्हेगारीत वाढ होत होती.

बंडखोर जमातींना शिक्षा करण्याच्या किंवा त्यांचे बंड चिरडून टाकण्यासाठी या कायद्याचा उपयोग होत असे. यामध्ये अनेक वेळा लोक मारले जात असत. त्याचा परिणाम संपुर्ण जमातीवर घडून येत होता. ब्रिटीश सत्तेविरूद्ध त्यांच्या मनात प्रचंड राग, असंतोष निर्माण होत असे. त्यामुळे वारंवार बंडे उद्‌भवत. रामोशी, कोळी, भिल्ल, मांग, मुंढा ही त्यांची उदाहरणे होती. या १७७१ पासून जवळपास १९४२ अखेर या जमातींना प्रत्येक छोट्या मोठ्या बंडात भाग घेतला असे दिसून येते. त्या दमनयंत्रात अनेक माणसे ठार मारली गेली असे दिसते.

या कायद्यामुळे गुन्हेगारीत किंवा बंडात घट होण्यापेक्षा वाढ होत आहे असे दिसून येते. त्यामुळे ब्रिटीशांनी अधिक दमनकारी कायदे, आणि बंधने घालून या जमातींना नियंत्रणात आणण्याचा प्रयत्न केला. या जमातीना एका ठिकाणी कोंडवाड्यासारखे डांबून ठेवावे किंवा त्याची वसाहत निर्माण करावी अशी संकल्पना पुढे आली. युरोपात ज्यू लोकांच्या घेट्टो

सारख्या कल्पनेवरून किंवा अमेरिकेतील निग्रोंच्या घेट्टो कल्पनेवरून सेटलमेंट ची कल्पना उचलण्यात आली. १९०८ साली सेटलमेंटचा कायदा झाला. या कायद्यानूसार गुन्हेगार जमातीच्या सेटलमेंट्स निर्माण करण्यात आल्या. या कायद्याच्या तरतूदीनूसार या कायद्याने देशभरातल्या राज्य सरकारांना गुन्हेगार जमातीच्या नोंदणी, पोलीसाकडून लक्ष ठेवण्याचे व प्रत्यक्ष गुन्हे केलेल्यांना वसाहतीत दाखल करण्याचे व्यापक अधिकार देण्यात आले. या कायद्याचा गैरवापर करून पोलीस आणि स्थानिक अधिकाऱ्यांनी अक्षरशा गुलामासारखे, गुराढोरासारखे या लोकांना वसाहतीत डांबले. साध्या गुन्हेगारांना एका तारेच्या कुंपणात तर अधिक धोकादायक गुन्हेगारांना दुहेरी तारांच्या कुंपनात डांबण्यात आले. अतिशय अमानुष आणि क्रूर वागणूक माणसांना देण्यात आली.

यापूर्वी १८९७ साली या कायद्यात दुरूस्ती करून गुन्हेगार समाजातील सदस्यांना वाढीव शिक्षेची तरतूद करण्यात आली. गुन्हेगार जमातीत जन्माला आलेल्या चार वर्षाच्या वरील बालकांना त्यांच्या आईबाबापासून जबरदस्तीने वेगळे करण्यात आले.

दिर्घकालीन परिणाम

१) अत्याचार – हा कायदा हातात आल्यापासून पोलीस, प्रशासन, आणि स्थानिक पाटील पटवारी, पटेल, कुलकर्णी यांच्या हाता कोलीत मिळाल्यासारखे झाले. त्यामुळे गुन्हेगारांना अत्याचार ही नित्याची बाब ठरली होती. यामध्ये १)ब्रिटीश पोलीस व प्रशासनाकडून होणारा अत्याचार २) समाजाकडून होणारा अत्याचार.

१) पोलीस व प्रशासनाकडून होणारा अत्याचार

या कायद्यामुळे ब्रिटीश पोलीस आणि लष्करी अधिकाऱ्यांच्या हाती आयते कोलीत मिळाले होते. बंड चिरडून टाकण्यासाठी आणि कायदा सुव्यवस्थेला आव्हान देणाऱ्या गुन्हेगार जमातींना धडा शिकवण्यासाठी त्याचा वापर करण्यात आला. भारतीय पोलीस ट्रेनिंग मध्ये क्रिमीनल मॅन्युअल शिकवले जाते. या जमातीचा इतिहास, गुन्हेगारीचा इतिहास, त्यांची गुन्हा करण्याची पद्धत (चेवशी जशीरपवळ) याबाबत सखोल ज्ञान होऊन पोलीस ट्रेनिंग मधून बाहेर पडत. त्यामुळे पूर्व दूषीत मतग्रहामुळे, मनमानी कारभार यामुळे अनेक निष्पाप आणि निर्दोष लोकांना जीवाला मुकावे लागत असे. अगदी अलीकडच्या दहा वर्षात महाराष्ट्रात जवळपास दहा पारध्यांचा विविध ठिकाणी पोलीस कोठडीत मृत्यू झाला आहे. त्याच पद्धतीने मागील वीस वर्षापूर्वी अनेक बेरड, रामोशी जमातीतील लोकांना बेळगाव महाराष्ट्र या भागात पोलीस कोठडीत मृत्यू झाल्याचा किंवा खोट्या चकमकीत ठार मारल्याची घटना घडल्या आहेत. आजचे हे भयानक वास्तव्य असेल तर त्या काळी कशा पद्धतीने अत्याचार घडत असावेत. चोरी दरोडे झाले की ठरावीक वस्तीवर पोलीस आजही छापा टाकतात. संपुर्ण

वसाहत, वस्त्यांना वेठीला धरून त्यांना पोलीस स्टेशन मध्ये डांबले जाते.

१८१८ पासून १९४२ पर्यंत रामोशी बेरड या जमातीनी ब्रिटीश विरोधात प्रचंड बंड केले. १८२० ते १८३१ पर्यंत उमाजी नाईक याने बंड केली. त्यांच्या बंडाच्या नायनाटासाठी त्यांचे बायका मुले आणि भाऊ यांना तुरूंगात टाकू न छळ करण्यात आला. उमाजीला १८३२ साली फासावर लटकविण्यात आले. तर त्या नंतर तुकाराम महंकाळ यांनाही फासावर देण्यात आले. १८५७ च्या बंडात सहभागी, नाना रामोशी (कुंडल) पिराजी / अन् त्याचा भाऊ यांना सातारा येथे तोफेच्या तोंडी दिले. तर हरी रामोशी याला जेजूरी येथे सोमवती आमावस्येला भर दिवसा फासावर लटकविण्यात आले. १८५० च्या निशस्त्रीकरणाच्या कायद्या विरोधात बंड करणाऱ्या हलगली मुधोळ (कर्नाटक) गावाने बंड केला. मुधोळच्या भर बाजारात हजारो लोकांच्या साक्षीने भर चौकात या लोकांना फासावर लटकवण्यात आले. अन्य सहा जनांना हलगली गावात गोळ्या घातल्या. त्यानंतर १९४२ पर्यंत अनेक भूमीगत स्वातंत्र्य सैनिकाच्या आणि त्याच्या कुटुंबियाना पोलीस अत्याचाराला सामोरे जावे लागते.

१९११ मध्ये कायद्यामधील दुरूस्तीनंतर नोटीफिकेशन सेक्शन ४ खाली रजिस्ट्रेशन नोंदणी सेक्शन १० किंवा ११ खाली प्रतिबंध करणे अशा स्वरूपाचे कायद्याचे टप्पे होते. पण अधिकाऱ्यांच्या मनमानी कारभारामुळे आणि कायद्याचा हवा तसा अर्थ काढल्याने बेकायदेशीर रीत्या या जमातीवर खटले भरले गेले. बेकायदेशीर अटक करण्यात आले. त्याचपद्धतीने या जमातींना वसाहतीत दाखल करण्याची कारवाई करण्यात आली. याबाबतचा अधिकार जिल्ह्यांचे कलेक्टर, डी.एस.पी यांना देण्यात आला.

याच कायद्याने (१९२३) जिल्हा न्यायदंडाधिकाऱ्याने घेतलेल्या निर्णयाबाबत हस्तक्षेप करण्याचा अधिकार कोणालाही नव्हता. यामुळे व्यक्तीनूसार कायद्याचा वापर होत असे.

स्थानिक पातळीवर पाटील, कुलकर्णी यांना अधिकार दिल्यामुळे स्थलांतरणासाठी पास देण्यासाठी, सदस्यांना रजिस्टर न करण्याच्या बदलात त्यांच्याकडून लाच घेणे किंवा पाटलांच्या शेतात फुकट राबणे, काही वेळा चोरीसाठी प्रोत्साहन दिले जात असे. समाजसुधारक रविशंकर व्यास (महाराज) मुन्शी कमीटी समोर साक्ष देताना म्हणतात. '' एखाद्या धरल हातात हुक्का घेऊन गावातील हम रस्त्यातून गेला तर तो पटेलांचा अपमान समजण्यात येऊन त्याचे नाव रजिस्टर मध्ये नोंदविले जात होते. शेतावर काहीही काम असेल तर पटेल मंडळी काही धडधाकट तरूणांना रजिस्टर करून त्यांच्याकडून शेतीची कामे करवून घेत.

पाटील, पटवारी गैरसोयीच्या वेळी हजेरी घेत. रात्री अपरात्री, सकाळी, पहाटे हजेरी द्यावी लागत असे. काही वेळा पाटील वेठ बिगारी करायला लावी. स्वत:ची कामे करवून घेई. काही वेळा संगनमताने हजेरी बूक न भरता ठेवत असे. तर रामोशी बेरड लोकांना काही पाटील

गुन्हे करायला प्रवृत्त करत असे किंवा मुद्देमालाची विल्हेवाट लावत किंवा पाटलास त्यातील हिस्सा द्यावा लागे. गुन्हेगार मॅन्युअल व गुन्हेगार जमातीचा इतिहास रद्द व्हायला महाराष्ट्राने स्वातंत्र्याची ५६ वर्षे घेतली.

सामाजिक अत्याचार

या गुन्हेगार कायद्याने या जमातीकडे बघण्याचा दृष्टीकोन पूर्णपणे वेगळा होता. गुन्हेगार जमाती भटक्या होत्या. किंवा जंगल आश्रीत होत्या. तर काही रामोशी, वडार आदि जमाती या गावाच्या आश्रयाने राहत होत्या. रामोशी जमात १८ व्या शतकापर्यंत भटकी आणि जंगल आश्रीत जमाती होत्या. हळूहळू गावच्या आश्रयाने सैनिकी पेशामुळे ही जमात गाव वाड्यात राहू लागली. गाव वाड्यात बलूतेदारामध्ये त्यांचा समावेश नव्हता. ही प्रक्रिया स्थिरावल्या नंतरची होती. जरी काही जमाती गावगाड्याच्या आश्रयाने राहत असल्या तरी गावाने त्यांना आपले मानले नाही. त्यांनीही गावाला आपले मानले नाही. या जमातीची जात व्यवस्था, जात पंचायत, लिंग पूजा, मातृ सत्ताक पद्धती, जमातीबाहेर संबंध वर्ज्य असणे. त्यामुळे मुळ प्रवाहापासून तूटकच राहत होते. स्वत:ला त्यांनी स्वत:च्या कोषात बंदिस्त करून घेतले होते. त्यांच्या चालीरीती, रूढी, परंपरा अन्य समाजापेक्षा भिन्न होत्या. त्यामुळे अन्य समाजाचा पाहण्याचा दृष्टीकोन चूकीचा झाला होता. या जमातीतील नितीमत्तेच्या कल्पना या भद्र समाजापेक्षा वेगळ्या होत्या. त्यामुळे ही जमात वेगळी पडली. मुळात हिंदू धर्मात जाती-प्रथा, उच्च निच प्रथा होती. एक जात दुसऱ्याच्या भानगडीत पडत नसे. एकावर एक अशी जातीची उतरंड होती. जातीचे कोंडवाडे होते. अशा वेळी उच्च वर्गाने या जमातींना किंवा भद्र समाजाने या लोकांना ब्रिटीशांनी गुन्हेगार घोषीत केल्यामुळे या जमातीना जाती प्रक्रीयेत सामावून घेऊन त्यांना खालच्या जातीचा दर्जा दिला. शुद्रापेक्षा कमी दर्जा दिला. तर अस्पृश्यापेक्षा थोडा वरचा दर्जा असे त्याचे काहीसे स्वरूप होते.

त्यामुळे त्यांच्यावर सामाजिक अत्याचार होत. खून,बलात्कार, जमीन हडप करणे, घरे जाळणे, वस्त्या जाळणे आदि प्रकार घडत. गुन्हेगारीच्या शिक्क्यामुळे तर त्यामध्ये वाढ होत असे. चोरीमारीच्या संशयामुळे घरेदारे लूटली जात. तर गावातून हुसकावून लावणे. आदि प्रकार सर्रास घडत, गुन्हेगार जमाती कायदा अन् जाती व्यवस्था यांच्या अजब मिश्रणामुळे अन्य समाजाचा कायमचा दृष्टीकोन कलुषीत, संशयास्पद राहिला आहे. त्याचे परिणाम आजही जमातींना भोगावे लागत आहे. याचाच परिपाक आजही या जमातीना भद्र समाजाने आणि इतिहास कारांनी या समाजातील बंडखोरांना स्वातंत्र्य सैनिक किंवा हुतात्मा मानले नाही. उमाजी नाईक, रघु भांगरा, हरी रामोशी, ढौलती नाईक या असंख्य हुतात्म्याच्या रक्तावर देशाला स्वातंत्र्य मिळाले. परंतू, त्यांची साधी आठवण समाजाने ठेवली नाही. इतिहास कारांनी पुसटशी सुद्धा दखल घेतली नाही. यासाठी चळवळ करावी लागते. तर

अन्यायाविरोधात प्रतिकार करणाऱ्या तंट्या, भिल्ल, रघोजी साबळा, सिंधूर लक्ष्मण, बाज्या बैज्या, या बंड खोरांना समाज आणि पोलीस यांनी दोषीत नजरेणे पाहिले. त्यांनी प्रचलित समाज व्यवस्थेविरूद्ध बंड पुकारले. स्वत:वरील अन्यायाचे परिमार्जण करण्यासाठी हाती शस्त्र धरले. जुल्मी पाटील व सावकार यांना ठोकून काढले. परंतू, कायद्याच्या दृष्टीने ते गुन्हेगारच होते.

१९४२ च्या प्रतिसरकारच्या भूमीगत चळवळीत महाराष्ट्र आणि कर्नाटकातील रामोशी बेरड लोकांनी प्रचंड मदत केली. प्रतिसरकार स्थापनेसाठी संदेश ने आण, भाकरी पोचविणे, पोलीसांच्या बातम्या देणे आदि कामे केली. क्रांतीकारकांना मदत केली. त्याचे शेकडो उदाहरणे महाराष्ट्रात आहेत. परंतू या लोकांची उपेक्षा झाली. स्वातंत्र्य सैनिक म्हणणे दूरच याउलट त्यांना पोलीस अत्याचाराला सामोरे जावे लागले.

मानवी हक्क

१८७१ च्या कायद्याने संपुर्ण जमातच जन्माने गुन्हेगार मानने म्हणजे अमानूष आणि मानूसकीला काळीमा फासणारी घटना आहे. या कायद्याने संपुर्ण जातच गुन्हेगार ठरविली गेली. त्यांना कोंडवाड्यात डांबले गेले. अगदी रात्री सुद्धा शौचालयाला जाऊ दिले जात नसत. त्यासाठी डबे असत. आईबाबापासून लहान मुलांना वेगळे केले जाई. जबरदस्तीने वसाहतीत दाखले केले जाई. पाटील, पटवारी वेटबिगारीसारखे राबवून घेतले जाई.

तर पोलीस अत्याचाराला तर सिमाच नव्हती. या पोलीस अत्याचाराने शेकडो निष्पाप जीवांचा बळी गेला होता.

या कायद्याचे भयानक परिणाम या जमातींना भोगावे लागले. आजही लागत आहे. त्याचे वर्णन शब्दात करण्या पलीकडचे आहे.

सन्मानाने, प्रतिष्ठेने जगण्याचे मुक्त स्वातंत्र्य या कायद्याने हिरावून घेतले. मुलभूत मानवी हक्क या कायद्याने नाकारले. आजही त्याचे प्रत्यंतर वारंवार येते.

पुर्नवसन /विस्थापन

मुळात या जाती जंगल आश्रीत किंवा जंगलात किंवा गावाच्या आश्रयाने राहत होत्या. परंतू, या कायद्याच्या दणक्याने सुरूवातीला पोलीस ससेमिरा आणि भद्र समाजाचा पूर्व दूषीत दृष्टीकोन त्यामुळे त्यांना वारंवार विस्थापीत व्हावे लागले. या जमाती आणि विस्थापन यांचे एक सुत्र बनले. बलवान लोकांनी आक्रमण करून कधी कायद्याच्या धाकाने कधी समाज व्यवस्थेतील बदलाने हजारो वर्षा पूर्वीचा इतिहास तपासला तर त्यांना वारंवार विस्थापित व्हावे लागले. १८७१ च्या कायद्याने या जमातीवर कुटीरा घात केला. या कायद्यामुळे जंगलातून विस्थापीत व्हावे लागले, मुक्त स्वातंत्र्यावर बंधने आली, उपजिवीकेचा प्रश्न

निर्माण झाला. त्यातून भटकंती सुरू झाली. ना गाव, ना देश, ना स्वत:ची हक्काची मातृभूमी अशी अवस्था या लोकांची झाली.

१८७१ च्या कायद्यातील दुरूस्तीमुळे पुढे सेटलमेंटचा कायदा निर्माण झाला. या कायद्याने देशातील कोणत्याही भागातील (राज्यातील) वसाहतीत दाखल करण्याचा सरकारला अधिकार प्राप्त झाला. यामुळे काही वेळा जबरदस्तीने, तर काही वेळा लाच दिली नाही म्हणून वेट बिगारी मुळे अशा अनेक कारणामुळे मुळगाव सोडून त्यांना विस्थापीत व्हावे लागले.

दुसऱ्या बाजूला या जमातीचे विस्थापन रोखण्यासाठी त्यांना सुधारण्याचा मार्गावर आणण्यासाठी कायद्यामध्ये १९०८, त्यानंतर ११,२३ मध्ये ) सुधारणा झाल्या. कायद्याने त्यांचे पुनर्वसन व्हावे. त्यांच्या मुलांना शिक्षण मिळावे, स्वत:चे घर मिळावे, इतर काही कौशल्ये मिळावी किंवा रोजगार मिळावा या साठी वसाहतीमध्ये सुधारणा घडवून आणाव्यात हे पुढच्या काळात मागणी वाढत गेली.परंतू इंग्रज आधिकारी किंवा देशी आधिकारीनी या कायद्याचा पहिला भागच पाहिला. पुनर्वसनाच्या मुद्याकडे अक्षरश: दुर्लक्ष झाले.एच. ओ. स्टार्ट, सेमिंग्टन या सारखे आधिकारी वगळता पुनर्वसनाचा व्यापक किंवा प्रामाणिक प्रयत्न कोणी केला नाही.तर ख्रिश्चन मिशनऱ्यानी थोडी फार प्रमाणात पुनर्वसनाचा प्रयत्न केला.त्या मागे धर्मांतराची लालूच होतीच व त्या प्रमाणे काही ठिकाणी धर्मांतरही केले.त्यामुळे प्रामाणिक, गंभीर अशा प्रकारे पुनर्वसन या जमातीचे झाले नाही.स्वातंत्र्यानंतर तर आनंदच आहे.आजही काही जमातीची भटकंती थांबली नाही.यांना हक्काचे गाव, जमीन, स्वत:चे घर, मतदार याद्दीत नाव, रेशन कार्ड काहीही नाही. ही स्वातंत्र्यानंतरची शोकांतिका आहे.आजही पारधी, कंजार भाट,यांचे पुनर्वसन किंवा स्थिरीकरण प्रक्रिया पुर्ण झाली नाही.तर स्थिर असणाऱ्या जमातींना रोजगार, विकास, प्रकियाची फळे अद्याप त्यांच्या पर्यत पोहोचली नाही. हंगामी मजूर म्हणून , ऊसतोडणी कामगार, खण कामगार वरील कामे या पोटासाठी करावी लागतात.. काही वेळा भिक मागून जगावे लागते. त्यासाठी पुनर्वसन धोरण आखणे व त्याची अंमलबजावणी होणे गरजेचे आहे.

१८७१ कायदा विरोधी चळवळी

या कायद्यातील पार्श्वभुमी आणि कारणे पाहाताना या कायद्याला ब्रिटीश मानसिकता कारणी भूत होती.परंतू हा कायदा अंमलात आल्या नंतर काही काळानंतरच युरोपात, इंग्लंडमध्ये सुंदरलॅन्ड, स्टीफन्स, या तत्ववेत्यानी गुन्हेगारी व शिक्षा या विषयी क्रांतीकारक विचारांची मांडणी केली.या सर्वानी जन्माने कोणी गुन्हेगार असतो हं सिध्दांत चुकीचा ठरवला. या सर्वांचा एकत्रीत परिणाम ब्रिटीशावर आधिकाऱ्यावर होत होता.त्यांचे प्रतिबिंब त्यानंतरच्या कायद्यामधील दुरूस्त्यामधुन दिसत होते.

ब्रिटीश सरकारने नेमलेल्या वेगवेगळया कमिटया, पोलीस समिती, ऑल इंडिया जेल कमिशन, यानी शिफारसी करताना सुधारात्मक दृष्टिकोणातून शिफारसी केल्या होत्या. तर मुन्शी कमिशन (१९४७) आणि एच.ओ.स्टार्ट समिती (वसाहतीचे कामकाज)यानीही सुधारात्मक दृष्टीकोन ठेवला होता.परंतू हा कायदा रद्द व्हावा किंवा या गुन्हेगार जमातीचा मानवी हक्क बहाल करून इतरा प्रमाणे जीवन जगण्याची मुभा मिळावी.असा काही क्रांतीकारक विचार मांडला नव्हता.

मुक्ती सेनेने गुन्हेगार जमातीत पुर्नवसनाचे महत्वपुर्ण काम केले होते. मुक्ती सेना (सौल्व्हेशन आर्मी )ची स्थापना विल्यम बुथ याने केली.अन्न, स्वच्छता, शांतता ही या संघटनेची मुळ तत्वे होती.या बाबत रॉबट सॅडल म्हणतो, या ऐहीक आयुष्यामध्ये प्रचंड दु:ख भोगत असलेल्या आणि त्यामुळे पुढील स्वर्गापासून वंचीत होणाऱ्या लोकांना मुक्त करणे. आणि ज्या प्रकारच्या वर्तणूकीपासून ही दुखे निर्माण झाले असतील त्यात सुधारणा घडवून आणणेही मुक्ती सेनेचे कार्य आहे. ''विल्यम बूथचा जावई फेडरीक बूथ'' याने गुन्हेगारी जमातीत काम करण्यास सुरूवात केली. त्याने फकीरसिंग हे भारतीय नाव घेतले. गुन्हेगारी जमातीसाठी शेती, वसाहती सुरू करण्याचा प्रयत्न केला. त्याने प्रथम गोरखपूर नंतर इतर राज्यात डोंब, साँसीया, भाटू, हबूरा, नट, कारवाल, वेप्पुपरिया, कोची, येरकुला या जमातीचे पुर्नवसन केले. १९२३ पर्यंत त्यानी ७८४० लोकांचे पुर्नवसन केले. तर १९३३ पर्यंत या संघटनेकडे ३३ वसाहती होत्या.

या शिवाय जर्मन मराठी मिशन, अमेरिका मिशन, ऑस्ट्रेलिया मिशन अशा अनेक मिशनरी संस्था गुन्हेगारी जमातीत काम करीत होत्या. स्टार्ट सारखा निष्पृह अधिकारी सोलापूरच्या वसाहतीत लाभला होता. त्याने या वसाहतीमध्ये अनेक सुधारणा घडवून आणल्या. त्याने पुर्नवसनाचे काम केले.

मुन्शी कमिशन वगळता पुर्नवसन किंवा कायद्यात सुधारणा घडवून आणण्यात सांगणारे सर्व युरोपियन होते किंवा ब्रिटीश होते. यांच्याकडून क्रांतीकारक कृती अपेक्षित नव्हती परंतू, या देशात स्वातंत्र्यासाठीच्या अनेक चळवळी झाल्या. दलित आदिवासीच्या चळवळी झाल्या. परंतू, या चळवळीने या विमुक्त जमातीवर माणुसकीला काळीमा फासणाऱ्या कायद्याकडे दुर्लक्ष केले असे म्हणावे लागेल. तरी सुद्धा १९४० नंतर या कायद्याच्या अमानूषते विरोधी चळवळ आणि जागृती सुरू झाली. अनेक समाज सुधारक, राजकीय नेते, विचारवंत यांनी हा कायदा रद्द करण्यात यावी अशी मागणी केली. या कायद्याची अमानुषता त्यांच्या ध्यानात आल्यामुळे या चळवळीला चालना मिळाली. रविशंकर व्यास, पंडित जवाहरलाल नेहरू, ठक्कर बाप्पा, लाल बावटा पक्षाचे पुढारी यांनी या कायद्याच्या विरोधात चळवळीला चालना दिली.

मद्रास हायकोर्टाने एका खटल्याच्या निकालात म्हंटले गुन्हेगारी जमाती कायदा हा आपल्या कायद्यामधील डाग आहे आणि तो नष्ट झाला पाहिजे. १४ मे १९३९ रोजी तिन्नवेली येथे झालेल्या गुन्हेगारी जमातीच्या परिषदेमध्ये एका न्यामूर्तीने आपल्या संदेशात गुन्हेगारी जमाती हा मानवी मूल्याच्या विरोधी आहे असे म्हंटले आहे.

१० ऑक्टोंबर १९३९ ला बिहारचे गव्हर्नर एस.एस.अणे यांनी गुन्हेगार परिषदेच्या अध्यक्ष पदावरून असे म्हंटले की, ''खुप विचारांती एखादी संपुर्ण जमात ज्यांच्यातील काही लोकांच्या चूकीमुळे गुन्हेगार म्हणून जाहीर करण्यास त्यातील सदस्यांची नोंदणी करण्यास विरोध केला. आणि केवळ त्यांच्यातील चुकांमुळे गुन्हेगार म्हणून जाहीर करण्यात आला आणि केवळ त्यांच्या वरील संशयामुळे त्यांच्या स्वातंत्र्यावर बंधने आणण्याचा जाचक अमानवी निर्बंध विरोधात आक्षेप घेतले. आम्हाला गुन्हेगार जमाती कायद्यातील कलम २३ ला कडवा विरोध करणेही आवश्यक वाटले कारण त्यातील अमानषतेमुळे कठोर व सऱ्हाईत गुन्हेगारच निर्माण होतील. सदर कायद्यात प्रारंभी काही महत्व असेल व त्यात काही तथ्य असेल तरी तो आता निर्वीवादपणे काल बाह्य झाला. ''

त्याच परिषदेत कोंडा व्यंकट पुय्या, दिवाण बहादूर, व्ही भाष्यम, अय्यंगार या कायदे तज्ञांनीच या कायद्याला विरोध केला. न्याय खात्याचे मंत्री डॉ. के.एन.काटजू यांनी याच प्रकारे विरोध दर्शविला आहे.

या सुमाराला देशभर या कायद्याविरोधी जोरदार चळवळ सुरू झाली. यामुळेच निरनिराळ्या प्रांतीक सरकारनी या कायद्यात दुरूस्त्या केल्या.

१९४२ ला मुंबई सरकारने कलम २३ मधील जन्मठेपेची शिक्षा रद्द केली. मद्रास सरकारने या कायद्यातील काही कलमांची अंमलबजावणी थांबविली. १९४८ मध्ये मद्रास प्रांतात हा कायदा रद्द झाला. तर १३ ऑगष्ट १९४७ ला मुंबई राज्याने हा कायदा रद्द केला.

३१ डिसेंबर १९४७ ला गव्हर्नर जनरलच्या आदेशाने असे म्हंटले आहे की, दोन वर्षाच्या आत हा कायदा रद्द करण्यात येईल. तोपर्यंत या संदर्भातील योग्य ती पावले उचलावीत. संपुर्ण देशात हा कायदा रद्द होण्यासाठी १९५२ साल उजडावे लागले.

या कायद्याविरोधात छ. शाहूंचा अपवाद वगळता बहुजन दलित, आदिवासी चळवळींनी दुर्लक्ष केले. त्यांना या कायद्याच्या अमानुषतेची जाणीव नव्हती. हे या जमातीचे दुर्दैव होते. या जमातीतून क्रांतीकारक असे नेतृत्व उभे राहिले नाही.

या १८७१ चा कायदा रद्द करण्याचा क्रांतीकारक निर्णय छ. शाहूंनी आपल्या राज्यात घेतला. हा कायदा रद्द करून ते थांबले नाहीत तर पारधी जमातीची पुर्नवसनाचे गंभीर आणि प्रामाणिकेपणे प्रयत्न केले त्यामुळे बेरड, पारध्यांचे पुर्नवसन आज झाले आहे.

## उपसंहार

भारतात प्रथमतः ईस्ट इंडिया कंपनीने पाय रोवल्यानंतर त्यांनी इंग्लंडच्या धर्तीवर कायदे अंमलात आणले. जमीन, जंगल, मालमत्ता या संदर्भात हे सगळे कायदे भारताला नवखे होते. कारण या देशात हिंदूंचे, मुस्लीमांचे, आदिवासी टोळ्याचे स्वतंत्र कायदे होते. जंगलाचा कायदा भारतीयांना सर्वस्वी अपरिचीत होता.

त्याचबरोबर छोट्या मोठ्या संस्थानिकांचे सैन्य बळ कमी करून किंवा विविध कारणे दाखवून संस्थाने, राज्ये, खालसा करण्याचा सपाटा लावला होता. त्यामुळे त्यांना स्वत:ची स्वायतता आणि स्वातंत्र्य धोक्यात आल्याची भावना निर्माण झाली. तर त्यावर अवलंबून असणारे सैनिकी पेशातील त्याचबरोबर वरकड आणि आश्रीत लोक बेकार झाले होते. त्यामुळे छोटे मोठे उठाव झाले. हे उठाव निर्दयपणे चिरडून टाकले. याचवेळी नवनवीन शोध लागून दळणवळणाची साधने निर्माण झाली. त्यामुळे व्यापारावर अवलंबून असणाऱ्या जमाती उध्वस्त झाल्या. त्याचबरोबर छोट्या चकमकी, लूटालूट, दुष्काळामुळे अराजकतेची परिस्थिती निर्माण झाली होती.

या छोट्या मोठ्या चकमकीत, बंडात, रामोशी, भिल्ल, कोळी, कैकाडी, पारधी, मुढा या लोकांचा लक्षणीय सहभाग होता. तर बेकार झालेले उपजिवीका आणि मुक्त स्वातंत्र्यावर बंधने आलेल्या जमाती उदरनिर्वाहासाठी चोऱ्यामाऱ्या करून पोट भरू लागले. त्यामुळे इंग्रजांच्या कायद्याचा राज्याला आव्हान वाटत होते.

त्यामुळे अशा लोकांचा नायनाट करण्यासाठी मोहिमा राबविल्या. पण तेवढे पुरेसे नव्हते. त्यासाठी दमनकारी कायद्यांचा वापर करून त्यांनी यांचा समूळ नाश करण्याचा चंग बांधला. त्यापूर्वी १८५७ चे बंड झाले. त्यामधून निशस्त्रीकरणाचा कायदा अंमलात आला.

ज्यू आणि जिप्सी बद्दल भावना भारतीय जातीव्यवस्थेबद्दलचे गृहीतक यावर आधारीत कायदा तयार झाला. त्यामुळे हजारो निष्पाप लोकांना या कायद्या आधारे चिरडून टाकले. त्यांचे जीवन नरक बनविले.

अनेक शिक्षांना त्यांना तोंड द्यावे लागले. त्यांच्या मुक्त स्वातंत्र्यावर बंधने आली. माणुसकीला काळीमा फासणारे अत्याचार झाले. जनावरासारखे कोंडवाड्यात कोंडून ठेवले. अधिकारी आणि पोलीस अधिकाऱ्यांचा मनमानी कारभार सुरू झाला. १९२३ च्या कायद्याने प्रांतिक सरकारने कायदा, सेटलमेंट बनविण्याचे अधिकार देण्यात आले. त्यानी मनमानी कारभार सुरू केला. स्थानिक यंत्रनेच्या अधिकाराबाबत साम्यता नव्हती. त्यामुळे मनमानीपणे कायद्याची अंमलबजावणी सुरू झाली. त्याचा फटका निष्पाप लोकांना बसला. १९४० नंतर हा कायदा रद्द व्हावा. यासाठी जोरदार प्रयत्न झाले. १९५० पर्यंत काही राज्यानी हा कायदा रद्द केल्याचे जाहीर केले. परंतु, देशाच्या संसदेने अधिकृतपणे १९५२ साली हा कायदा रद्

केला.

१५ ऑगष्ट १९४७ रोजी या देशाला स्वतंत्र मिळाले. त्यानंतर १९५० मध्ये राज्यघटना स्विकारली गेली. सार्वभौम, समाजवादी, धर्मनिरपेक्ष अशी लोकशाही प्रणाली अस्तित्वात आली. स्वातंत्र्य, समता, बंधूला या तत्वाचा उद्‌घोष केला गेला. कायद्यासमोर सर्वजन समान गणले गेले. नागरीकांना मुलभूत मानवी अधिकार प्रदान करण्यात आले. परंतू देशभरच्या गुन्हेगार जमातींना कागदावरचे अधिकार देण्यात आले का ? हा मुलभूत प्रश्न होता.

स्वातंत्र्य मिळाल्याच्या नंतर १८७१ चा कायदा रद्द झाला. परंतू, निरनिराळ्या राज्याने या कायद्याचे नाव बदलून सराईत गुन्हेगार कायदा बनविला. (कलळींीरश्र जषषशपवशी रलीं) या कायद्यातील कलमे जवळपास १८७१ च्या कायद्यासारखीच होती. पोलीस मॅन्युअल मध्ये त्याचप्रमाणे ट्रेनिंग मध्ये गुन्हेगार जमाती विषयक इतिहास शिकवीला जात होता. तथाकथीत पुरोगामी असणाऱ्या महाराष्ट्राने हा मॅन्युअल रद्द करण्याठी स्वातंत्र्यानंतरची जवळपास ५८ वर्षे घेतली. पूर्वीसारख्या अमानूषतेने या कायद्याखाली हजारो लोकांना पोलीस कोठडीत डांबून ठेवले जात होते. निष्पापांना कायद्याखाली अटक होत असे. अगदी १९९० च्या दशकापर्यंत रामोशी, कैकाडी, कोळी, पारधी लोकांच्या वस्त्यावर पोलीसांची छापे घातली जात असत. म्हणजेच ज्या लोकांना स्वातंत्र्या नंतरही कायद्याने गुन्हेगार मानले जात होते. जर समाजाचा दृष्टीकोन आजही बदलला नाही. हिंदू धर्मात जातीच्या खिचडीत गुन्हेगार जमाती नावाचा नवीनच वर्ग निर्माण झाला. हा सारा इंग्रजांनी केलेल्या कायद्याचा प्रताप होता.

किमान ब्रिटीशांनी कायदा करताना किमान या जमातीच्या पुर्नवसनाचा गंभीरपणे विचार केला. शिक्षण, रोजगार, राहण्यासाठी, कौशल्ये देण्यासाठी कायदे केले. त्याची थोडीफार अंमलबजावणी केली. परंतू, देशी राज्य कर्त्यांनी आणि बेजबाबदार प्रशासनाच्या पुर्नवसनाबाबत ठोस आणि गांभिर्याने प्रयत्न केले नाही. त्यावर अनेक चळवळी झाल्या. कमिट्या, कमिशन, शिफारसी झाल्या. सरकार मात्र पाण्यात बसलेल्या रेड्यासारखे ढिम्म आणि निर्वीकार आहे.

स्वातंत्र्यानंतर बजेट मध्ये या जमातीच्या विकासासाठी अणि योजनासाठी एक पै ची सुद्धा तरतूद केली नाही. नाही म्हणायला महाराष्ट्र सरकारने दयाळू अंतकरणाने या वर्षीच्या बजेटमध्ये ३३ कोटी पारधी पुर्नवसनाची तरतूद केली. यामधील जमातींना पोटासाठी भटकंती करत जीवन जगत आहेत. आजही त्यांना स्वत:चे हक्काचे गाव नाही. मतदार यादीत नाव नाही. रेशनकार्ड, दारीद्रयरेषेखालील नावाचा पत्ता नाही. तर त्या जमाती ग्राम व्यवस्थेच्या आश्रयाने राहिले आहेत. त्यांना धड जागा,घरे नाहीत, नागरी सुविधांचा पत्ता नाही.

रोजगारासाठी ६ महिने हंगामी मजूर म्हणून बागायत क्षेत्राकडे, रस्ते, विटभट्या कडे जावे लागले. तर दुसऱ्या बाजूला शिक्षणाची बिकट अवस्था आहे. प्राथमिक शिक्षणात गळतीचे प्रचंड प्रमाण आहे. मुठभर लोक माध्यमिक शिक्षण घेऊ शकतात. असा सगळा सावळा गोंधळ आहे

स्वातंत्र्यानंतर या जमातीच्या निश्चित असे सर्व्हेक्षण झाले नाही. त्याची आकडेवारी नाही. १९३१ च्या जातवार जणगणनेनंतर एकदाही त्यांचे सर्व्हेक्षण करणेत आले नाही. त्याच्यासाठी विकास योजना तर शेकडो मैल लांब आहेत. स्वातंत्र्य मिळविण्याच्या गोंधळात तत्कालीन सरकारने १८७१ चा कायदा रद्द करण्याचे ठरविले होते. त्यावेळेच्या केंद्रीत गृह खात्याने सर्व राज्य सरकारना सूचना केली होती की, या जमातीना गुन्हेगारी जमाती न समजता मागासवर्गीय समजण्यात यावे. (गृह खात्याचा जि.आर नं १५४९/५ दि.१६ जुलै १९४७) भारतीय राज्य घटनेने कलम १५ मध्ये या जमातीची खास नोंद घेतली. परंतू देशभर या जमातींना एस.सी किंवा एस.टी यादीत समावेश करण्यात आला. परंतु अनेक राज्यांनी मनमानी, बेजबाबदार पणे या जमातींना या जमातींना या यादीत समावेश केला नाही. भटक्या विमुक्त यादीत यांचा समावेश केला. महाराष्ट्र हे त्याचे उत्तम उदाहरण आहे.

वेगवेगळ्या राज्यात व प्रादेशिक भाषेत किंवा काही ऐतिहासीक संदर्भानूसार या जमातींना वेगवेगळी नावे आहेत. उदा. महाराष्ट्र - रामोशी बेरड, कर्नाटक - बेरड नायकवाल्मिकी, महाराष्ट्र- पारधी, गुजरात - वाघरी, महाराष्ट्र - बंजारा, गुजरात - छारा बंजारा, महाराष्ट्र - कैकाडी, तामीळनाडू - कोरवा. इ.

त्यामुळे एकच जमात विविध राज्यात वेगवेगळ्या यादीत आहेत. त्याच्यात एक वाक्यता नाही. अजूनही कमिशने स्थापन होतातच. त्याच्या शिफारसीचे गठ्ठे विधानसभा आणि लोक सभेत शो-पीस म्हणून ठेवली आहेत. त्यामुळे अद्याप त्यांची परवड थांबलीनाही.

यासाठी या जमातीच्या कल्याणासाठी सरकारने काही गांभिर्याने प्रयत्न करणे आवश्यक आहे. अन्न, वस्त्र, निवारा, आरोग्य, शिक्षण या मूलभूत गरजा भागविण्यासाठी या जमातीचे पुर्नवसन व्हायला हवे. जल, जमीन, जंगल याच्यावर देशाचे नागरीक म्हणून हक्क प्रस्थापित झाला पाहिजे. इथल्या साधन सामुग्रीचे उत्पादन साधनावरही मालकी हक्क प्रस्थापित झाला पाहिजे. इथल्या साधनसामुग्री उत्पादन साधनावरही मालकी हक्क प्रस्थापित झाला पाहिजे. मुलभूत जगण्याचा मानवी अधिकार मिळायला हवा. तरच लोकशाही अन् राज घटनेने दिलेली कागदावरची तत्वे प्रत्यक्षात अंमलात येतील. आणि या जमाती समाजाच्या मुख्य प्रवाहात येतील.

या जमातीच्या प्रश्नावर फक्त सरकार वर अवलंबुन न राहता या जमातीत काम करणारे कार्यकर्ते, संस्था, संघटना यानी व्यापक जन जागरण केले पाहिजे. हा प्रश्न फक्त या

जमातीचा नाही, तर तुमचा आहे.त्या साठी भद्र समाजाची (लर्ळींळश्र ीलळशीूं) जबाबदारी आहे. ते प्रश्न समजावून घेण्याची व त्याकडे संवेदशीलने पाहाण्याची.

सरकार अनेक वेळा प्रश्नाला बगल देण्यासाठी कमिशन, कमिटया नेमते. त्याचे रिपोर्ट धूळखात पडतात. मुळ प्रश्न बाजूला पडतात. स्वातंत्रपुर्व काळात आणि स्वातंत्रेनंतर काळात भटक्या विभुक्तांच्या प्रश्नावर व क्रिमीनल ट्राईब्ज ॲक्ट वर किती तरी कमिशन कमिटी झाल्या. पण मुळ प्रश्न आहे तसेच आहे. या जमातीच्या प्रश्नावर सर्वाधिक कमिशन, कमिटया आजपर्यत नेमल्या गेल्या. (राज्य व केंद्र सरकार स्वातंत्रपुर्व उत्तर काळ )

या जमातीच्या बदलत्या काळाप्रमाणे प्रश्नही बदलत आहेत. जागतीकरण, उदारीकरण, खाजगीकरणाच्या युगात त्यांचे प्रश्न, उपजिविकेचा प्रश्न, पुर्नवसन, विस्थापनाचा प्रश्न गंभीर आहेत. त्यासाठी प्रश्नांच्या व्यावहारीक सोडवणूकीसाठी सरकार त्यावर कोणती उपाययोजना करेल ? याचा व्यवहारीक दृष्टिकोन घेऊन प्रश्नांची फेरमांडणी व्हायला हवी. शिस्तबध्द, शास्त्रीय पायावर त्याची शास्त्रशुध्द मांडणी व्हायला हवी. भटक्या विमुक्त जाती जमाती काम करणाऱ्या सर्वाचे मते विचारात घेऊन मांडणी व्हावी. हे प्रश्न सोडवण्यास व्यापक रणनीती तयार करावी लागेल.१)प्रथम लर्ळींळश्र ीलळशीूं मधील, बुध्दजीवी, विद्वान, अकॅडेमिशन, विचारवंत आदीनी या प्रश्नावर सातत्याने भुमिका घ्यावी,बोलावे,लिहावे लागेल. या प्रश्नावर जनमत तयार करावे लागेल. सरकारवर दबाव टाकावा लागेल.२)दुसऱ्या बाजुला ाशवळर ने महत्वपुर्ण भुमिका पार पाडली पाहिजे.राष्टीयस्तर, ाशवळर मधून लेखन आवश्यक आहे. त्यासाठी सर्वानी लेखन करावे. ३) बुधन थिएटर सारखे कलावंताच्या माध्यमातून लर्ळींळश्र ीलळशीूं मध्ये जागृती, संवेदनशीलता जागवायला हवी ४)राष्टीय स्तर -या जमातीत काम करणाऱ्या लोक ांना एकत्र आणून लोक चळवळ उभी करून सरकार वर दबाव आणावा लागेल.५) या जमातीचे प्रश्न आकलन करण्याची क्षमता वृध्दी साठी प्रयत्न व्हावे लागेल.

६)लोकभाषेत प्रचार साहित्य निर्माण व्हावे.

तरच यातून व्यापक अशी देशभर लोक चळवळ उभी राहील. यामधून सरकार वर दबाव वाढेल. आणि सरकार या प्रश्नावर काही ठोस भुमिका घेईल. सरकारला हलवू शकणारी, सरकारी यंत्रणेला हादरा देणारी लोक चळवळ सरकारला काही भुमिका घ्यायला भाग पाडेल.

या सेमिनार मधुन एवढी जरी भुमिका पार पाडता आली. तर फार मोठे योगदान या सेमिनारने दिले असे मला वाटते. त्यासाठी सर्वानी यावर कटिबद्ध होऊया.

## संदर्भ साधने

१)चितोडिया आदिवाशी भटका समाज - प्रा. श्रध्दा पाटील, दिलीपराज प्रकाशन प्रा. लि.पुणे

२) विभुक्तायन - माने लक्ष्मण, यशवंतराव चव्हाण प्रतिष्ठान, मुंबई

३) राजे उमाजी मुक्काम डोंगर - आठवले सदाशिव,कॉन्टिनेंटल प्रकाशन, पुणे

४) वनवासी व उपेक्षित जग -डॉ.पिंगळे भिमराव

५) सिंधू संस्कृती -डॉ.पाटणकर भारत

६) बुधन -भाषा व संशोधन,प्रकाशन संस्था, बडोदा.

७) उमाजी नाईक -प्रा.जाधव बाबासाहेब, निर्मल प्रकाशन

८) बंद दरवाजा, उपरा -माने लक्ष्मण, श्रविद्या प्रकाशन, पुणे

९) उचल्या -गायकवाड लक्ष्मण, श्रविद्या प्रकाशन पुणे.

१०) बेरड, आक्रोश - डॉ.गस्ती भिमराव, राजहंस प्रकाशन,पुणे

११) झंझुरक - संपादक लक्ष्मण चव्हाण, डॉ.अजय दांडेकर, लोक परिषद, पुणे.